# नवभारत

वर्ष १० वें ] डिसेंबर १९५६ [ अंक ३



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष दहावें | नवभारत | डिसेंबर
अंक तिसरा | | १९५६

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ४४६ शीव रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( ज. सातारा )

# 'नवभारत' मासिक, डिसेंबर १९५६

## —लेखक-परिचय—

**श्री. हर्बर्ट पासीन**– ओहायो-राज्य विद्यापीठांतील ( अमेरिका ) समाजशास्त्र व मानववंशशास्त्राचें प्राध्यापक.

**प्रा. म. म. वा. वि. मिराशी**– (नागपूर) प्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित व पुराणेतिहाससंशोधक. ' कालिदास,' ' संशोधन-मुक्तावली ' इत्यादि ग्रंथांचे लेखक.

**प्रा. ए. रा. धोंगडे**– मुंबईच्या सिडनॅहॅम कॉलेज ऑफ कॉमर्सचे आचार्य व अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. वी. डी. महाजन**– औरंगाबाद येथील मिलिंद महाविद्यालयांतील अर्थशास्त्र व राज्यशास्त्राचे प्राध्यापक.

**प्रा. म. दा. साठे**– जबलपुर येथील ट्रेनिंग कॉलेजांतील भूतपूर्व प्राध्यापक; इंदूरचे हरिशास्त्री भट व पुण्याचे म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांचे शिष्य. अनेक मासिकांतून स्फुट लेखन.

**श्री. शं. वा. किर्लोस्कर** – " किर्लोस्कर " मासिकाचे माजी संपादक, प्रसिद्ध चित्रकार व कलावंत, " किर्लोस्कर बंधु लि. " चे एक भागीदार.

**डॉ. र. भ. कर्णिक** – पुण्याचे एक जाणते सामाजिक कार्यकर्ते व डॉक्टर, " इंडियन मेडिकल जर्नल-" चे एक माजी संपादक.

**प्रा. र. चिं. बडवे** – नडियाद येथील जे. जे. कॉलेजमधील राज्यशास्त्राचें प्राध्यापक.

**प्रा. म. गो. भाटे** – डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या मुंबई येथील बॉम्बे कॉलेजचें प्राचार्य व इंग्रजीचें प्राध्यापक.

**प्रा. म. रा. दंडवते** – मुंबईच्या सिद्धार्थ कॉलेजांतील पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राध्यापक, मुंबई शहर प्रजासमाजवादी पक्षाचे चिटणीस, अ. भा. समाजवादी पक्षाच्या कार्यकारिणीचे सभासद.

---

अनुक्रमणिका

श्री. हर्बर्ट पासीन

# अतिपूर्वेकडील प्रदेशांतील अस्पृश्यता

" अस्पृश्यता " हा शब्द सामान्यत: हिंदुस्थानशींच संबंधित आहे असें समजलें जातें; तथापि आशिया खंडांतील इतर भागांत देखील या ना त्या स्वरूपांत अस्पृश्यता आढळते. प्रस्तुत लेखांत हिंदुस्थानांतील खालच्या जाती, जपानमधील एटा-हिनीन्, कोरियांतील पैकूशॉंग आणि तिबेटमधील राग्यप्पा अशा त्यांतील[१] चार गटांचाच विचार केला आहे; आणि तो देखील दोन प्रश्नांच्या अनुषंगानेंच: ( १ ) या गटांतील साम्य व भेद कोणते ? ( २ ) ज्यांच्या पाठपुराव्यामुळें अस्पृश्यतेच्या वाढीला अनुकूल सामाजिक परिस्थिति निर्माण होते असे कांहीं सामान्य घटक सांगतां येतील काय ?

निश्चित अनुमानें पुढें मांडण्याचा प्रस्तुत लेखाचा उद्देश नाहीं. विविध संबंधित क्षेत्रांतील तज्ज्ञांचें लक्ष वेधलें जाईल अशा प्रकारचे कांहीं प्रश्न उभे करणें वा सूचना पुढें मांडणें एवढाच माझा हेतु आहे.

समाजांतील कांहीं गट इतरांहून इतके भिन्न आणि कमी दर्जाचे आहेत कीं त्यांना अन्य समाजापासून अलगच ठेवलें पाहिजे याला मान्यता देणारी सामाजिक संबंधांची रचना म्हणजे 'अस्पृश्यते'वर आधारलेली रचना होय, अशी व्याख्या करतां येईल. सामाजिक गटागटांतील मर्यादा ओलांडणें जेव्हां बव्हंशीं अशक्य असतें आणि व्यक्तींचें या गटांतून त्या गटांत जाणें अगदीं किमान प्रमाणांतच आढळतें तेव्हां सामाजिक वर्गीकरणाचा आधार ' वर्ग ' नसून ' जाति ' हा बनतो ' अस्पृश्यता ' हें जातिभेदाचेंच आत्यंतिक स्वरूप होय. तिच्यामुळें विविध गटांतील येजा किंवा सामाजिक संबंध यांच्या मार्गांत सर्वांत अधिक अडथळे येतात. तथापि यामुळें अस्पृश्यतेचें वैशिष्ट्य स्पष्ट होत नाहीं. केवळ हीन दर्जा, मग तो कितीहि हीन असो, म्हणजे अस्पृश्यता नव्हे. त्यांच्यांत फरक केलाच पाहिजे. त्याचप्रमाणें जातिबहिष्कृतता वा जातिहीनता म्हणजेहि अस्पृश्यता नव्हे. अनेक जातिबाह्य लोक अस्पृश्य नाहींत.

येथें असें सूचित करावयाचें आहे कीं अस्पृश्यता ही निदान तीन निरनिराळे घटक एकत्र आल्यानेंच निर्माण होते. एक म्हणजे जन्मसिद्ध सामाजिक स्थानाच्या कल्पनेकडे पूर्णतया झुकणारी कडक जातिव्यवस्था. दुसरा म्हणजे ऐहिक सामाजिक स्थान व सद्गुण यांची निकटची सांगड घालू पाहणारा मनुष्य, निसर्ग व समाज याविषयीचा दृष्टिकोण. हा दृष्टिकोण ऐहिक ( धर्मातीत ) असेल किंवा धर्माधिष्ठितहि असूं शकेल. उदा० जपानमधील ' उच्च ' व ' नीच ' माणसें यांत भेद करणारा दृष्टिकोण ऐहिक आहे, तर हिंदुस्थानांतील कर्मसिद्धांताचें अधिष्ठान धार्मिक आहे. आणि यांच्यासमवेतच आवश्यक असलेला तिसरा घटक म्हणजे कांहीं वस्तु वा घटना या शारीरिक व धार्मिक भ्रष्टता ( विटाळ ) निर्माण करणाऱ्याच असतात अशी भ्रष्टतेविषयीची धार्मिक समजूत हा होय.

१. जुन्या काळांतील ब्रम्हदेशामधील पॅगोडांतील दास किंवा पॅराग्यून हे देखील एक प्रकारचे अस्पृश्य गटच होत. अजूनहि त्यांचे वंशज पॅगानमध्यें आढळतात. तथापि त्यांचा विचार येथें करावयाचा नाहीं.








या दृष्टीनें विचार केल्यास युरोपांतील ज्यू किंवा अमेरिकेंतील दक्षिण भागांतील नीग्रो इत्यादिंसारखे अस्पृश्यतेच्या जवळजवळ असलेल्या परिस्थितींत कांहीं गट सांपडतात. परंतु समाजांतील कांहीं गटांचीं भिन्न निवासस्थानें, सामाजिक संपर्काबाबत कडक निर्बंध, आणि त्याविषयीचें पुढारलेलें दिखाऊ बौद्धिक समर्थन हीं सर्व आशियांत पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेलीं दिसून येतात. हिंदुस्थान हें याचें एक प्रातिनिधिक उदाहरण होय.

येथें विचारांत घेतलेल्या चारहि प्रदेशांत अस्पृश्यता ही एका बदलत्या अवस्थेंतच दिसून येते. हें सारें विश्लेषण जपानमधील एटांच्या प्रश्नावरूनच मी पुढें नेलें आहे, कारण ह्या प्रश्नाचें स्वरूप मला चांगलें अवगत आहे. भारतीय प्रश्नाबाबत सुदैवानें भरपूर आणि तुलनात्मक दृष्टीनें तपशीलवार माहिती मिळूं शकते. कोरियासंबंधींचीं विधानें कोरियन व जपानी भाषांतून मिळणाऱ्या माहितीवर आधारलेलीं आहेत. त्यासंबंधीं तपशीलवार माहिती देणारा इंग्रजी ग्रंथ उपलब्ध असलेला माहित नाहीं. तिबेटबद्दल ज्ञात माहिती तोकडी आहे ही खेदाची गोष्ट होय. तथापि असें असूनहि ती अत्यंत सूचक असल्यानें तिचा अंतर्भाव केला आहे.

## हिंदुस्थानांतील अस्पृश्यता

जेते व जित, निरनिराळे धार्मिक गट, प्राचीन रानटी टोळ्या इत्यादि एकमेकांपासून अत्यंत भिन्न असलेल्या सामाजिक गटांना एकाच भौगोलिक व सामाजिक स्थानांत एकत्र रहावें लागल्यामुळें त्यांच्यांतील सामाजिक संबंध हाताळण्याचें एक साधन म्हणून हिंदुस्थानांतील जातिसंस्थेचा विकास झाला. हिंदुधर्माच्या सामाजिक धार्मिक कल्पनांमध्यें विविध सामाजिक गटांना ठराविक स्वरूपाचीं विशिष्ट कार्यें देऊन त्यांची सामाजिक उतरंड तयार करण्याची कल्पना खोलवर रुजलेली आहे. खिस्तपूर्व ६ व्या शतकापासून ३ ऱ्या शतकापर्यंतच्या काळांत हिंदुस्थानांत बुद्धधर्म अत्यंत लोकप्रिय होऊनहि त्याला या जातीय दृष्टिकोणाऐवजीं विश्वबंधुत्वाच्या कल्पनेला महत्त्व मिळवून देतां आलें नाहीं.[२]

व्यवसाय, वंश, धर्म, भाषा, वर्ण, कुल इत्यादि निरनिराळ्या गुणांवर आधारलेल्या जातींमध्यें सर्व समाज विभागला गेला. आर्य विजेत्यांचे वंशज उच्च आणि मुळांतील द्रविड लोकांचे वंशज नीच समजले गेले. हळुहळू मुळांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शुद्र या चार जातीऐवजीं सामाजिक कार्यांतील लहान सहान अनेक सूक्ष्म भेद व्यक्त करणाऱ्या जाती–उपजाती निर्माण झाल्या. आणि या सर्व जातींचे सामाजिक संबंध व्यक्त करणारी व सर्व समाजाला व्यापणारी अशी एक सुसंगत उतरंड तयार झाली.

या उतरंडीमध्यें प्रत्येक जातीचें निश्चित स्थान होतें; तथापि आपापल्या अंतर्गत व्यवहारांत प्रत्येक जात स्वायत्त होती. अन्य जातीपासून तिचें भिन्नत्व

---

२. अस्पृश्यता ही हिंदुधर्माचें एक स्वाभाविक अंग असून ती बुद्धधर्माच्या योगानेंच नाहींशी होऊं शकेल असें भारतीय अस्पृश्यांचे नेते डॉ. आंबेडकर यांना वाटतें हें उल्लेखनीय होय. यामुळें भारतीय अस्पृश्य जमातींना सामुदायिकरीत्या बुद्धधर्माची दीक्षा देऊन भारताला परत बुद्धाकडे नेण्याचें आंदोलन त्यांनीं सुरूं केलें आहे. या भूमिकेचें ऐतिहासिक व तात्त्विक समर्थन त्यांना त्यांच्या संशोधनांत आढळतें. मी या क्षेत्रांतील तज्ज्ञ नाहीं; आणि भारतीय इतिहासाच्या डॉ. आंबेडकरांच्या उपपत्तीबद्दल मला शंका घ्यावयाची नाहीं. तथापि एवढें मात्र निश्चितपणें म्हणतां येईल कीं आशियांतील इतर भागांमध्यें अस्पृश्यतेची वाढ होण्याच्या मार्गांत बुद्धधर्मानें कोणताहि अडथळा आणलेला नाहीं. किंबहुना अशा वाढीस त्यानें हातभारच लावला आहे असें खुशाल समजण्यास हरकत नाहीं.








दर्शविणारा प्रत्येक जातीचा विशिष्ट व्यवसाय होता आणि त्या जातीयांनीं तो परंपरागत व्यवसायच करावा अशी अपेक्षा होती. जातीजातींमध्यें विवाह किंवा एका जातींतून दुसऱ्या जातींत प्रवेश, यांस मनाई होती.

साफसफाइ, धोबीकाम, खाटिककाम, कातडें व जोडे शिवण्याचें काम इत्यादि हलक्या दर्जाचीं समजलीं जाणारीं कामें करणाऱ्या जाती स्वाभाविकपणेंच या उतरंडीच्या तळाशीं होत्या. हें सर्व कार्य वरिष्ठ जातींच्या दृष्टीनें अत्यंत हलक्या प्रतीचें व भ्रष्ट करणारें समजलें जाई. आणि त्यामुळ ज्या जातींना तें सतत करावें लागे, त्या कायमच्याच भ्रष्ट समजल्या गेल्या; आणि त्यांच्या संपर्कानें विटाळ होऊं नये म्हणून त्यांना सर्व समाजापासून अलग करावें लागलें. शिवाय, हिंदूना गोहत्या विशेष निषिद्ध. आणि यांतील बरींच कार्यें तिच्याशीं संबद्ध असलेलीं. यामुळ भौतिक आणि संकेतात्मक अशा दोन्ही दृष्टींनीं या अस्पृश्यांना शहराच्या वा गांवाच्या वेशीबाहेर स्वतंत्र वस्ती करून रहावें लागे. आणि उच्च जातीयांबरोबर संपर्क ठेवण्याची, संबंध येऊं देण्याची वा एकत्र अन्नग्रहणाची त्यांना पूर्ण मनाई होती. मंदिरप्रवेशाचीहि त्यांना बंदी असे.

तथापि केवळ सामाजिक उतरंडीमधील स्थान किंवा व्यवसायाचें अनिष्ट स्वरूप यांतूनच या जातींच्या आत्यंतिक भ्रष्टतेची कल्पना निर्माण झाली नाहीं. त्यांच्या नैतिक दृष्ट्या नीच समजल्या गेलेल्या स्थानांतूनहि ती उद्‌भवली आहे. समाजाच्या व्यावहारिक जीवनाबाहेरच त्यांचें स्थान मानलें गेलें आहे. आणि या नैतिक अवस्थेचें प्रतिबिंब म्हणजेच त्यांचा सामाजिक दर्जा हा होय. नीच जाती या आकस्मिकपणें नीच बनल्या नाहींत; त्यांची लायकीच त्या प्रकारची होती. त्या जात्याच नीच होत. काहीं अंशी मानवी पातळीच्या खालीं असलेल्या या त्यांच्या स्थानाबाबत कसलाहि इलाज नाहीं, असा दृष्टिकोण त्यांत आहे.

कार्यकारणभावाच्या अनंत साखळीनें म्हणजे कर्मानेंच प्रत्येकाचें जीवनांतील स्थान ठरतें असें हिंदु मानतात. विश्वाच्या विकासक्रमांतील कोणतीहि अवस्था ही त्यापूर्वीच्या सर्व घटनांचाच परिणाम होय. हा कार्यकारणभाव केवळ भौतिक नाहीं. नैतिक कार्यकारणभावाचीहि अशीच अनंत साखळी आहे; आणि व्यक्तीच्या दर्जावर तिचा परिणाम घडून येतो. पूर्वजन्मांतील माणसाची वृत्ति त्याचें या जन्मांतील स्थान निश्चित करते. त्यामुळें नीच जाती ह्या जणुं भूतकाळांतील पातकें व दोष यांच्याबद्दलचें प्रायश्चित्तच घेत आहेत. अर्थात् या जन्मीच्या सद्‌गुणामुळें व सद्‌वर्तनामुळें त्यांना पुढील जन्मीं उच्च स्थान प्राप्त होणें शक्य आहे.

## जपानमधील एटा–हिनीन

जपानमधील ' शिंटो ' या तद्देशीय धर्माचा कर्मकांडाच्या पावित्र्यावर अतिशय भर आहे. हें पावित्र्यहि शरीराची व आत्म्याची एक अवस्था मानली जाते. प्राचीन जपानी धर्माप्रमाणें स्वच्छता ही ईश्वरत्वाच्या खालोखालची अवस्था मानण्यांत येत नसे तर स्वच्छता म्हणजेच ईश्वरत्व असा त्याचा आशय होता. यामुळें ' शिंटो ' धर्मानुसार अनेक कृत्यें हीं कर्मकांडाच्या दृष्टीनें अपवित्र, भ्रष्ट, अशुद्ध अशींच समजलीं जात.

हिंदुस्थानांत हिंदुधर्मांतील अगतिक बनविणाऱ्या भ्रष्टतेविरुद्ध प्रतिक्रिया बुद्धधर्मानें व्यक्त केली. तथापि बुद्धधर्म जेव्हां जपानमध्यें आला तेव्हां तेथील अस्पृश्यतेच्या प्रश्नाच्या दृष्टीनें एक अत्यंत महत्त्वाची कल्पना त्यानें आणली ती म्हणजे जीवहत्या व मांसभक्षण या विषयीचा निषेध ही होय. शिंटोमधील रक्त व मृत्यु ह्यांच्या कर्मकांडात्मक अपवित्रतेच्या कल्पनेला यामुळें पुष्टी मिळाली. आणि याचाच परिणाम म्हणून बुद्धधर्म व शिंटो या दोहोंच्याहि दृष्टीनें जात्याच अपवित्र असलेले व्यवसाय हे भ्रष्ट मानले गेले. या व्यवसायांच्या यादींत







ऐतिहासिकदृष्ट्या भ्रष्टतेच्या कल्पनेंत जसजसा फरक पडत गेला तसतसा बदल झाला आहे हें खरें. पण त्या व्यवसायांचें स्वरूप सतत रक्त, मृत्यु, घाण या कल्पनांभोंवतींच फिरत आलेलें आहे. हिंदुस्थान-प्रमाणेंच खाटिककाम, मेलेलीं जनावरें व माणसें यांची व्यवस्था लावणें, साफसफाई इत्यादींचा तिच्यांत अंतर्भाव होतो. कालांतरानें टोपल्या विणण्याचें व अन्य वेतकाम, जोडे शिवण्याचें काम इत्यादि इतरहि हलकीं समजलीं जाणारीं कामें नीच जातीकडे म्हणजे एटांकडे सोंपविण्यांत आलीं. नीचकर्में करणाऱ्या कामगारांचा एटा हा समुदाय बनला.

हिंदुस्थानांतील अस्पृश्याप्रमाणेंच एटांनाहि स्वतंत्र वस्तीमधून रहाणें भाग पडलें. समाजापासून त्यांना अलग करण्यांत आलें. एटा या शब्दाचा अर्थ 'भरपूर भ्रष्टता' असा आहे. भ्रष्टता, हलका धंदा व हीन दर्जा यामुळें त्यांचा तिरस्कार होऊं लागला. सामान्य लोकांशीं विवाह व अन्य संबंध ठेवण्यास त्यांना मनाई झाली. सामाजिक मंदिरें व विहार येथें प्रवेश करण्याची त्यांना बंदी झाली. त्यांना केवळ आपल्या स्वतंत्र मंदिरांतच प्रवेश होता. एटाच्या स्पर्शाचा हिंदुस्थानांतील अस्पृश्याच्या स्पर्शाइतकाच विटाळ मानण्यांत येऊं लागला.

जपानच्या आधुनिक इतिहासाला आरंभ होण्यापूर्वीच्या काळांत मानवजात ही 'उच्च' व 'हीन' अशा दोन वर्गांत विभागली गेली आहे ही समजूत सर्वत्र दिसून येई. 'उच्च' म्हणजे वरिष्ठ वर्गांतील, स्वतंत्र व 'शिष्ट' लोक; 'हीन' म्हणजे खालच्या श्रेणींतील, भूदास, गुलाम, चाकर इत्यादि हलक्या दर्जाचे लोक. हीन लोकांनीं त्यांच्या दर्जास अनुसरून त्यांच्या वाट्याला येणारीं कार्यें करणें स्वाभाविक व नैतिकदृष्ट्या श्रेयस्कर समजलें जाई. जपानच्या इतिहासांत 'हीन' समजल्या जाणाऱ्या या गटांचें स्वरूप बरेंच बदलल्याचें दिसून येतें. 'हीन' समजल्या जाणारांचा 'उच्च' वर्गीयांत अंतर्भाव झाल्याचींहि उदाहरणें आढळतात. परंतु हा भेद मात्र कायम राहिला आहे. हीन हे केवळ या जगांतील त्यांच्या स्थानाच्या दृष्टीनेंच हीन होत असें नव्हे; तर ते नैतिक दृष्टीनें देखील हीन, मानवी पातळीखालील, समाजसंस्थेच्या बाहेरचे असेच लोक होत. जुन्या काळांतील जपानी शेतकरी हे दरिद्री व हीन असेच होते. गुलामांच्या व त्यांच्या जीवनांत फारच थोडा फरक आढळे. तथापि तरीदेखील त्यांच्यांत आणि एटांत कधींहि भरून न येणारें महदंतर होतें. 'उच्च' व 'नीच', मनुष्य व मानवी पातळीखालचे लोक यांच्यांतीलच हें अंतर म्हणतां येईल.

जपानच्या सामाजिक इतिहासांत 'हीन' हे मानवी पातळीखालील लोक होत–हिनीन् या शब्दांतच ती कल्पना व्यक्त झाली आहे– ही कल्पना सातत्यानें आढळते. टोकुगावाच्या काळांत एटांची गणना माणसांऐवजीं जनावरासाठीं वापरण्यांत येणाऱ्या वर्गीकरणानुसार करण्यांत येई. खानेसुमारींत एकतर त्यांची गणतीच केली जात नसे किंवा इतर लोकांहून भिन्न गणती केली जाई. कांहीं वेळां ही कल्पना अगदीं हास्यास्पद वाटणाऱ्या आत्यंतिक टोकापर्यंत नेली जाई. एटांच्या वस्तींचा उल्लेख केला जात नसे इतकेंच नव्हे तर त्यांच्या वस्तींचा भाग टाळतां यावा यासाठीं नकाशे देखील लहान केले जात. या दृष्टिकोणाचें उत्तम उदाहरण म्हणून कदाचित् १८५९ सालच्या एका प्रसिद्ध न्यायनिवाड्याचा उल्लेख करतां येईल. एटा व अन्य लोक यांच्या टोळयांतील एका मारामारींत एक एटा तरुण मारला गेला; यामुळें इकेडा हरिमा-नो-कामीकडे एटांचा कांटो जिल्ह्यांतील नेता डान्झेमॉन यानें न्याय मिळावा म्हणून फिर्याद केली. काळजीपूर्वक विचारांतीं नंतर प्रसिद्धी पावलेला निवाडा न्यायाधीशानें दिला: "एक एटा हा सामान्य माणसाच्या १/७ मोलाचा होय.

यामुळें दोषी माणसांस मी शिक्षा करावी अशी तुझी इच्छा असल्यास त्यांना तुझ्याकडच्या आणखी सहा जणांस तूं मारूं दिलें पाहिजेस." आज देखील एखाद्या एटा माणसाचा अपमान करावयाचा झाल्यास त्याला 'चार' असें म्हणण्यांत येतें किंवा चार बोटें हवेंत वर उचलून दाखविलीं जातात. याचा अर्थ जनावरांप्रमाणें ते चतुष्पाद आहेत असा तरी असावा किंवा सामान्य माणसांच्या खालची पातळी सूचित करण्यासाठीं पांचाहून कमी म्हणजे चारच बोटें त्यांस आहेत असें तरी म्हणावयाचें असावें.

## कोरियांतील पैक्‌शॉंग

कोरियामधील समाजबाह्य गटांचें जपानशीं बरेंच साम्य आहे, सामान्य नागरिकांच्या गांवांतील वा शहरांतील वस्तीबाहेरच ते राहतात; आणि हलक्या दर्जाचे व अस्वच्छ व्यवसाय करतात. समाजाकरवीं त्यांच्याकडे परकेपणाच्या व तुच्छतेच्या दृष्टीनेंच पाहिलें जातें. हें गट मुख्यत: पुढीलप्रमाणें होत. पैक्‌शॉंग; खाटिककाम, कसाईगिरी व कातडी कमावण्याचा धंदा करणारे. जपानमधील एटासारखेच हे गट होत; आणि चिअॅन्, हे जपानमधील हिनीन् गटांशीं जुळणारे गट होत. करमणूक करणारे, भिकारी, फेरीवाले व तत्सम वेळोवेळीं बदलणारे व्यवसाय यांत मोडतात.

बाह्य जगाशीं यांचे संबंध अनेक निर्बंधानीं जखडलेले आहेत. सामाजिक संपर्क हा अगदीं किमान स्वरूपांत आढळतो. विवाह, सहभोजन इतकेंच नव्हे तर इतरांबरोबर साधा सामाजिक संबंध वा जाणेयेणें ठेवण्यास देखील त्यांना मनाई होती. इतकेंच नव्हे तर सामान्य माणसें करीत असलेल्या अनेक गोष्टी त्यांनीं करणें योग्य समजलें जात नसे, उदा० रेशमी कपडे वापरणें. सर्व विवाहित माणसें वापरीत असलेल्या गोल टोप्या त्यांच्या दृष्टीनें फारच वरच्या दर्जाच्या समजल्या जात. बायकांना टोप्यांच्या शोभिवंत पिना वापरण्याची मनाई होती. पैक्‌शॉंग माणसानें आपल्या घरावर कौलें घातलीं कीं त्याचा निकालच लागायचा! कांहीं निर्बंध तर अत्यंत कमीपणा आणणारे होते आणि त्यांच्यामुळें पैक्‌शॉंग माणसाच्या भावनावर अत्यंत खोल आघात होत असला पाहिजे. मृतांना पुरण्याच्या जागा वेगळ्या; आणि इतरांप्रमाणें गाडींतून शव नेण्याची मनाई! विवाहसमारंभास इतरांना होती त्यांप्रमाणें मुलांना घोड्यावर बसण्याची वा मुलींना मेण्यांतून जाण्याची परवानगी नव्हती.

उच्च आणि नीच वर्गामध्यें स्वभावत: वस्तुगत असाच भेद आहे हें पौर्वात्य राष्ट्रांतील सामाजिक उतरंडीच्या मुळाशीं आढळणारें गृहीतकृत्य कोरियांतील कन्फुशियन धर्मानें अत्यंत कडक स्वरूपांत मान्य केलें होतें. उच्च वर्ग हे अधिकार गाजविण्याण्याठीं, सद्‌गुणोपासनेसाठीं आणि ज्ञानाची उपासना करण्यासाठीं जन्माला आले आहेत. आणि नीच वर्ग हे आज्ञापालन व सेवा करण्यासाठींच जन्मले आहेत; काहींहि झालें तरी कन्फुशियन नैतिकतेचें त्यांना आकलन होणें अशक्य आहे. उच्च वर्ग हे केवळ अधिक श्रीमंत, अधिक आदरणीय व शिक्षित आहेत एवढेंच नव्हे तर ते अधिक सद्‌गुणीहि आहेत.

अशाप्रकारें हलक्या दर्जाचा व्यवसाय म्हटला कीं अनैतिकता वा सद्‌गुणांचा अभाव आलाच, असें समजण्याची वृत्ति कोरियांतील मूळच्या कन्फुशियनधर्मांत होतीच. कोरियांत जेव्हां बुद्धधर्म आला तेव्हां त्यांतील जीवहत्येची बंदी व शाकाहार यांचा तेथें परिणाम होणें अपरिहार्य होतें. जपानमध्यें तो नांवारूपाला येण्याच्या सुमारें शंभर वर्षें आधीं हें घडून आलें. हीन वर्गाबद्दल मुळांत असलेली तिरस्कारदृष्टि बुद्धधर्मामुळें अधिक बलवान् होऊन हीनवर्गीय हे केवळ तिरस्करणीयच नसून दुराचरणी व पापी होत ही कल्पना तेथें रुजली.












अशा प्रकारें कोरियो काळापर्यंत समाजबाह्य समजले जाणारे वर्ग अस्तित्वांत आलेले होते. १३९२ साली यी वंशाची राजवट सुरू होतांना चीनच्या प्रभावाखालील इतर समाजांप्रमाणेंच कोरियांतील सामाजिक वर्गांचें देखील अधिकृतरीत्या पुन: संघटन करण्यांत आलें. आणि उच्च, सद्गुणी वर्ग म्हणजे यांगबान् व सामान्य जनता यांच्यांतील भेद पद्धतशीरपणें प्रस्थापित करण्यांत आला. चार वर्गांत केल्या गेलेल्या या विभागणींतील सर्वांत नीच म्हणजे चॉनमीन हा वर्ग होय. जपानमधील जात्याच नीच समजल्या गेलेल्या वर्गांशीं यांचें स्थान बरेंच जुळणारें आहे. या वर्गीकरणाच्याहि बाहेर, अगदी हीन स्वरूपाच्या अधिकृत गटापलीकडे ' खाजगी ' गट म्हणून पैक्शॉंग समजले गेले. त्याच गटांत आणखी सात हलक्या धंद्यांचा उल्लेख करण्यांत आला होता. अशाप्रकारें पैक्शॉंग या संज्ञेनें दोन गटांचा उल्लेख होऊं लागला. एक म्हणजे खरे पैक्शॉंग म्हणजे खाटीक काम, बुरुड काम इत्यादि स्वरूपाचे हलके धंदे करणारे व दुसरे म्हणजे चिॲन् किंवा वेश्याव्यवसाय करणारे.

१८९४ सालच्या 'चारहि वर्गांना समान हक्क' देणाऱ्या अधिकृत फर्मानामुळें पैक्शॉंग यांचीं बंधनें कायद्यानें नाहींशी करण्यांत आलीं. तथापि जपानप्रमाणेंच सामाजिक भेदभाव पूर्वींसारखेच कायम राहिले व भ्रष्टाभ्रष्टाच्या व विधिनिषेधाच्या कल्पना जपानी राजवटींतहि कायम होत्या. दुसऱ्या महायुद्धाच्या आरंभापासूनच्या अनुभवानंतर काय झालें आहे याबद्दल मात्र निश्चित सांगणें कठीण आहे.

## तिबेटमधील राग्याप्पा

तिबेटविषयीच्या माहितींत राग्याप्पा या जातिबाह्य वर्गाचा उल्लेख आढळतो. ल्हासा या राजधानींतच ' पवित्र ' अंतर्वर्तुलाकार वस्तीच्या दक्षिणेस इतरांपासून अलग असे हे राहतात. ते फक्त ल्हासांतच असावेत असें दिसतें व त्याची संख्या सुमारें १००० इतकी असेल. इतर ठिकाणाप्रमाणेंच रक्त, मृत्यु व घाण यांच्यांशीं संबंधित अशीं अनेक हलकीं कामें ते करतात. भंगी, खाटिक, प्रेतांची व्यवस्था लावणारे, रस्ते व सार्वजनिक स्थळें येथून मेलेलीं गुरेढोरें वाहून नेणारे इत्यादि तेच होत. त्यांना प्राप्ती या कार्यांपासून त्याचप्रमाणें भिक्षेपासून होते. आणि भिक्षेबाबत त्यांना कांहीं खास हक्क आहेत. फरारी गुन्हेगारांचा शोध लावण्याचें काम त्यांनाच दिलें जातें. आणि ज्या गुन्हेगारांना परत घरीं जाऊं देणें शक्य असतें अशांना त्यांच्या वस्तींतच राहण्यासाठीं त्यांच्या हवालीं करण्यांत येतें.

' अस्पृश्यते ' विषयीच्या कल्पनांचा उद्भव होण्यासाठीं इतरत्र जे आवश्यक घटक दिसतात तेच तिबेटमधील समाजांतहि आहेत असें वाटतें. निसर्ग व समाज या विषयीच्या विचारावर आधारलेली निश्चित उचनीचतेच्या दर्जाच्या उतरंडीची कल्पना, आणि रक्त व घाण यांच्या संपर्कानें भ्रष्टत्व होतें ही कल्पना. तिबेटमधील बुद्धधर्मांत अस्तित्व हें एक अनंतकाळ फिरणारें चक्र आहे ही हिंदुधर्मासारखीच कल्पना आहे. यामुळें या जीवनांतील दर्जा हा पूर्वजन्मींच्या पापपुण्याच्या वजावाटीचाच परिणाम होय असें मानलें जातें.

## चारहि उदाहरणांतील साम्य

आतां या चारहि उदाहरणांत आढळणाऱ्या महत्त्वाच्या साम्यांचा थोडक्यांत विचार करूं. त्या सर्वांना समाजजीवनाबाहेरचे म्हणूनच समजलें जातें. ऐतिहासिक वस्तुस्थिति कांहीहि असो, समाजापासून त्यांचा हा अलगपणा त्यांच्या मुळांतील वंशभिन्नत्वाचा परिणाम होय असें अनेकवार समजलें जातें. दुसरें एक सामान्य लक्षण म्हणजे त्यांना ' नीच ' व ' भ्रष्ट ' समजण्यांत येतें हें होय. आणि कांहीं वेळां तर ते मानवी पातळीच्या खालींच आहेत असाहि समज आढळतो. सगळीकडेच ते








इतके हीन समजले जातात कीं त्यांचा स्पर्श तर दूरच परंतु त्यांची उपस्थिति देखील विटाळ कारक असते; आणि सामान्य माणसांच्या दृष्टीनें धोक्याची समजली जाते. यामुळेंच त्यांना काटेकोरपणानें अलग ठेवण्यांत आलें आहे. त्यांची वस्ती इतर वस्तीच्या बाहेर आढळते व अशा प्रकारें त्यांचें समाजबाह्य स्थान सूचित करते. त्यांची स्मशानें देखील भिन्न असल्याचीं आढळतात. तथापि या अलगपणामुळ त्यांच्या गटात्मक जीवनांत बरीच स्वायत्तता राहिली. त्यांचें ऐक्य प्रभावी होत गेलें व धंदा व राजकारण या क्षेत्रांत त्यांना त्याचा अनेकवार फायदाहि मिळाला आहे.

त्यांच्याशीं शारीरिक व सामाजिक संपर्क हा अगदीं किमान स्वरूपाचाच राखण्यांत आला. विवाहादि संबंधांना तर बंदी होतीच; पण सर्व सामाजिक दळणवळणहि अशक्य होतें. त्यांच्याशीं व्यवहार करायचा म्हणजे अगदीं विस्तृत स्वरूपाच्या पद्धतीचा अवलंब करावा लागे; आणि स्पर्श टाळण्यासाठीं अनेक युक्त्या प्रयुक्त्या योजल्या जात. हिंदुस्थान व जपानमध्यें या जातिबाह्य लोकांना मागील दारानें यावें लागतें व घर भ्रष्ट होऊं नये म्हणून घरांत प्रवेश करूं दिला जात नाहीं. सार्वजनिक मंदिरें व विहार यापासून त्यांना दूर ठेविलें जातें. इतर सामान्य माणसांच्या अन्नाला त्यांना स्पर्श करूं दिला जात नाहीं. आणि सामान्य मानवतेचा स्वीकार दर्शविणारें एकत्र बसून खाणें हें त्यांच्याबाबतींत पूर्णतया वर्ज्य होतें.

या अलगपणाव्यतिरिक्त त्यांच्यावर इतरहि अत्यंत कठोर निर्बंध लादण्यांत आले होते. कित्येक वेळां त्यांच्याविषयीं केला जाणारा भेदभाव हा संपर्क टाळण्याच्या हेतूनें केला जात असे. इतर बाबतींत सामान्य माणसांना असलेले हक्क उपभोगण्याची त्यांची लायकी नाहीं आणि म्हणून त्यांना त्यांच्या स्थानींच ठेवलें पाहिजे हा विचार त्याच्या मुळाशीं होता. अशा प्रकारें, औपचारिक वा अनौपचारिक रीतीनें, त्यांना इतरांना प्राप्त होणारे नागरीक हक्क नाकारले जात. डामडौल, चैनीची राहणी, इतरांचें लक्ष वेधून घेण्याचे प्रयत्न इत्यादि स्वरूपाचें वर्तन केल्यास त्यांच्याकडे वक्रदृष्टी होई. जपानमधील टोकुगावाच्या राजवटींत त्यांनीं कोणता पेहेराव करावा व कोणता करूं नये यावरून तपशीलवार कायदे होते. कोरियामध्यें घरावर कौलें घालणें, रेशमी कापड किंवा गोल टोप्या वापरणें, घोड्यावर बसणें किंवा मेण्यांतून जाणें हें सर्व त्यांच्या दर्जाहून वरचें वर्तन समजलें जाई आणि तसें केल्यास ते शिक्षेस पात्र होत.

तथापि, विशेष नजरेंत भरण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यांच्या व्यवसायांतील तपशीलवार साम्य ही होय. तत्वतः त्यांच्याकडे समाजांतील तिरस्कृत, हलके परंतु आवश्यक व्यवसायच सोंपविण्यांत आले होते. कोणीतरी ते करणें भागच होतें. बहुधा रक्त, मृत्यु व घाण यांच्याशीं संबंधित असेच ते व्यवसाय करीत असत. उदा० त्या सर्वांना मेलेल्या जनावरांची या ना त्या मार्गानें वासलात लावणें, खाटिककाम, प्रेतें वाहून देणें, मांस साफ करणें व विकणें, कातडी कमावणें, त्यापासून जोडे वा अन्य वस्तु तयार करणें इत्यादि कामें करावीं लागत. साफसफाईच्या कार्याशींहि त्यांचा संबंध आलेला दिसून येतो; उदा० झाडूकाम, धोबीकाम, जनावरांचीं व माणसांचीं प्रेतें वाहून नेण्याचें काम इत्यादि. तथापि इतरहि अनेक कामें अशीं होतीं कीं, जीं अशाच स्वरूपाचीं असल्यामुळें किंवा मूळ कामांच्या व्याप्तीमुळें किंवा आकस्मिक संबंध जोडला गेल्यामुळें, कोणत्या ना कोणत्या कारणास्तव त्यांच्या कडेच सोंपवलीं जात. कारण ती प्रतिष्ठित समजलीं जात नसत तर उलट तिरस्कृत म्हणूनच त्यांच्याकडे पाहिलें जाई. उदा० विलो ( वेत ) च्या फांद्यापासून परड्या तयार करण्याचें काम विशेष अस्वच्छ नसूनहि हलकें कां वा भ्रष्ट समजलें जावें याचा उलगडा होत नाहीं.








कदाचित् आधींच भ्रष्ट समजल्या जाणाऱ्या दुसऱ्या एखाद्या कामाशीं त्याचें साधर्म्य असावें. जपानमध्येंहि कांहीं ठिकाणीं अशा परड्या तयार करण्याचें काम फक्त एटाच करीत. तसेंच मडकीं घडणें, लाकूडकाम, अशा सारखीं 'स्वच्छ' कामें देखील भ्रष्ट समजलीं गेलीं याची ऐतिहासिक उपपत्ति लागत नाहीं. येथें विचारांत घेतलेल्या चारहि देशांत अशा प्रकारच्या तिरस्कृत कामांच्या यादींत थोडाफार फरक आढळतोच. हिंदुस्थानांत धोबीकाम हें जातिबाह्य होतें; जपानमध्यें नव्हतें. कोरियामध्यें भटके भिख्खू हे जातिबाह्य समजले जात; हिंदुस्थान व जपानमध्यें तसें नव्हतें. कांहीं ठिकाणीं भंगीकाम हें घाणेरडें समजलें जाई; जपानमध्यें तो एक प्रतिष्ठित व्यवसाय मानला जात असे. आपल्या चार देशांच्या बाहेरचें उदाहरण घ्यावयाचें झाल्यास ब्रह्मदेशांत मंदिरांची निगा राखणें हा जातिबाह्य व्यवसाय होता; इतरत्र जातिबाह्य लोकांना मंदिरांच्या जवळहि येऊं दिलें जात नसे.

तत्वतः जातिबाह्य लोकांना जमीन मालकीची करणें वा खंडानें तिची कसणूक करणें याची मनाई होती. शेतीवर आधारलेल्या समाजांत जमिनीशीं असलेला संबंध ही सामाजिक दर्जांतील मध्यवर्ती कल्पना असते. यामुळें जमिनीपासून त्यांना 'दूर' ठेवल्यानें त्यांच्या जातिबाह्यतेला पुष्टि मिळते. अलीकडच्या काळांत ते हळुहळू जमीन घेऊं लागले आहेत. त्यांची भूमिहीनता किंवा अत्यंत लहान लहान तुकड्यांची मालकी हा हिंदुस्थान व जपानमधील पहिल्या प्रतीचा सामाजिक प्रश्न आहे.

चारीपैकीं तीन बाबतींत आपापली वस्ती करून राहणारे निश्चित जातिबाह्य लोक आणि भटके यांच्यांत फरक करण्यांत येतो. हिंदुस्थानांतील परिस्थिति अधिक गुंतागुंतीची असली तरी तेथें देखील अन्य समाजाशीं कायमचे ठराविक संबंध असलेले, वस्ती करून राहिलेले जातिबाह्य व भिकारी असे दोन गट आढळतात. जपानमध्यें या भेदाचे निदर्शक म्हणजे एटा व हिनीन् हे गट होत. कोरियामध्यें पैक्शॉंग आणि चिॲन् यांच्यांत तो भेद आढळतो.

## अस्पृश्यतेच्या उद्भवाचीं कारणें

आतां पुढील प्रश्नाकडे वळणें योग्य होईल. तो म्हणजे : या देशांतील सामाजिक परिस्थितींत अस्पृश्यता निर्माण होण्यास अनुकूल असे काहीं सामान्य घटक आढळतात काय ? कीं प्रत्येक उदाहरण हें ऐतिहासिक आकस्मिकपणाचें अपूर्व उदाहरण समजायचें ? मला असें सुचवावयाचें आहे कीं तीन निरनिराळया घटकांचा समुच्चयानें होणारा परिणाम ध्यानांत घेतल्यानेंच अस्पृश्यतेचा उलगडा होऊं शकतो: वंशपरंपरागत आलेली उच्चनीचतेवर आधारलेली सामाजिक उतरंडीची कडक कल्पना, सामाजिक दर्जाची कल्पना विश्वाच्या प्रकृतींतच अनुस्यूत आहे असें मानणारें तत्त्वज्ञान, आणि घाण व कर्मकांडांतील अपवित्रता यांचा संबंध जोडणारी भ्रष्टतेची कल्पना, समाजव्यवस्थेंत या तीन घटकांची जितकी अधिक पकड असेल तितकी तिच्यांत या ना त्या स्वरूपांत अस्पृश्यता निर्माण होण्याची शक्यता अधिक असें मानतां येईल.

आपल्या चारहि उदाहरणांत सामाजिक उतरंडीला अत्यंत महत्त्व आहे. त्यांतील तिघांत तर या बाबतींत तपशीलवार साम्य आढळतें. हिंदुस्थानांत हजारों उपजाती असल्या तरी मूळ जाती चारच: ब्राह्मण, क्षत्रिय, शेतकरी व वैश्य किंवा व्यापारी; आणि अस्पृश्य हे या सर्वांच्या बाहेर; टोकुगावा राजवटींतील जपानमध्यें उच्चकालीन सरदार, लढवय्ये, शेतकरी व व्यापारी; आणि एटा-हिनीन या सर्वांच्या बाहेर; यी राजवटींतील कोरियांत उच्चकुलीन सरदार, मध्यम वर्ग, सामान्य जनता आणि 'हीन' लोक; आणि पैक्शॉंग यांचा 'हीना'-मध्यें केवळ तांत्रिक अंतर्भाव; असें दिसून येतें.










या समाजांतील सामाजिक उतरंडीची ही कल्पना जन्मसिद्ध होती हेंहि या ठिकाणीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. यामुळें बदल किंवा विविध श्रेणींतील ये जा किमान स्वरूपांतच होई. वंशपरंपरेवर आधारलेली अशा प्रकारची उतरंड ही इतरांच्या मानानें कितीतरी कडक बनते हें उघड आहे.

अशा प्रकारच्या वंशपरंपरागत सामाजिक उतरंडीच्या कल्पनेंत व अस्पृश्यतेंत संबंध आहे हें यावरून उघड होईल. तथापि तो कितपत प्रत्यक्ष स्वरूपाचा आहे हें स्पष्ट होत नाहीं. कदाचित् जास्तीत जास्त म्हणजे एवढेंच म्हणतां येईल कीं वंशपरंपरागत सामाजिक उच्चनीचता आली कीं त्या समाजांत अस्पृश्यतेचीं चिन्हें दिसावयास हवींत; म्हणून शोध करण्यास हरकत नाहीं. तथापि, अशा प्रकारच्या कडक उच्चनीचतेवर आधारलेले परंतु अस्पृश्यता नसलेले समाजहि आढळतात. उदाहरणार्थ, सिलोनमध्यें जातिसंस्था असूनहि अस्पृश्यता नसल्याचें दिसतें. तथापि उलगडा करण्यास कठीण असें उदाहरण ब्रह्मदेशाचें आहे. कारण, तेथें अस्पृश्य असावेत असें दिसतें, पण माझ्या समजुतीप्रमाणें जातिसंस्था मात्र तेथें नाहीं.

या चारहि समाजांतील विश्वविषयक दृष्टिकोण भिन्न होता; तथापि प्रत्येक ठिकाणीं त्याच्यायोगानें सामाजिक स्थान हें अपरिहार्य, अपरिवर्तनीय, लायकीप्रमाणें प्राप्त झालेलें असतें या कल्पनेला मात्र पुष्टि मिळत असे. हिंदुस्थानांत कर्म व नैतिक कार्यकारणभावाच्या कल्पनेंत त्याचा उगम असल्यानें त्याचें अधिष्ठान धार्मिक होतें. जपानमध्यें धर्माधिष्ठित समाजरचनेऐवजीं समाजरचनेचाच धर्म बनविला गेल्याचें दिसतें. तथापि ' उच्च ' व ' हीन ' लोक ही विभागणी, सामाजिक भेद हे मुळांत नैतिक भेदच होत, ही मूलभूत कल्पनाच सूचित करते. कोरियामध्यें कन्फुशियन धर्मानें सामाजिक दर्जा व सद्‌गुण यांचा संबंध जोडला आणि समाजांतील दर्जाविषयक कल्पनांचें समर्थन केलें. तिबेटमध्यें बुद्धधर्मात हिंदुधर्मातील कर्मवाद जसाच्या तसा आढळतो.

अखेरीस चारहि उदाहरणांत भ्रष्टतेच्या व विधिनिषेधाच्या कल्पनांना अत्यंत महत्त्व आहे हेंहि नमूद करणें जरूर आहे. हलके, घाणेरडे किंबहुना तिरस्कृत असे अनेक धंदे आहेत; परंतु भौतिक अस्वच्छता व धार्मिक अपवित्रता यांच्या संबंधावर आधारलेली भ्रष्टतेची कल्पना त्यांना लागू केली जात नाहीं. उदाहरणार्थ, भंगीकाम हे निस्संशय अस्वच्छ म्हणतां येईल, पण जपानमध्यें रक्ताशीं संबंधित असलेल्या इतर व्यवसायाप्रमाणें तें भ्रष्ट मानलें गेलें नाहीं. वेगळया शब्दांत सांगावयाचें म्हणजे ' घाण ' या वस्तूंतून भौतिक आणि त्याचप्रमाणें धार्मिक अपवित्रतेची कल्पना निघणें जरूर आहे. अशा घाणेरड्या धंद्यांत जे आहेत त्यांनाच भ्रष्ट समजलें जातें; कोणत्याहि घाणेरड्या धंद्यांतील लोकांना नव्हे. [३]

---

३. टोकियोंतील सोफिया विद्यापीठाच्या Monumenta Nipponica या त्रैमासिकांतील Vol. XI No. 3 मधील पृ. २७ ते ४७ वरील लेखाचा संक्षेपानें केलेला स्वैर अनुवाद.








प्रा. म. म. वा. वि. मिराशी

# पैठणचा नवीन शिलालेख

' नवभारता 'च्या गेल्या सप्टेंबर महिन्याच्या अंकांत डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी पैठणचा एक महत्त्वाचा शिलालेख त्याच्या ठशासह प्रसिद्ध केला आहे. या लेखांत कालनिर्देश नाहीं, तथापि त्याच्या अक्षरवटिकेवरून व त्यांतील सोमेश्वराच्या उल्लेखावरून तो शके १०५०च्या सुमाराचा असावा असें अनुमान त्यांनी केलें आहे. तें खरें ठरल्यास मराठींतील कोरीव लेखांमध्यें हा पुष्कळच अगोदरचा ठरेल आणि त्यामुळें मराठी भाषेच्या अभ्यासाकरितां त्याचा उपयोग होईल. म्हणून त्याची आणखी चर्चा होणें जरूर आहे. तसा थोडासा प्रयत्न प्रस्तुत लेखांत केला आहे.

डॉ. तुळपुळे यांनीं आपल्या लेखाबरोबर मूळ शिलालेखाचा ठसा जोडल्यामुळें त्यांचें वाचन तपासणें व अक्षरवटिकेवरून त्यांनीं केलेल्या अनुमानाची युक्तायुक्तता ठरविणें शक्य झालें आहे. वाचनांत एकदोन दुरुस्त्या सुचवितों. प्रथम दुर्गा- ( भैरन व ) केशवेशबद्धकेसंरक्षते सर्वदा ( ओळ १-२ ) याबद्दल ' दुर्गाभैरन ( व ) केशवेशबद्धकेः, ( कैः ) संरक्ष्यते ' असें वाचलें पाहिजे. ( वांटोळ्या कंसांतील अक्षरें दुरुस्त केलेलीं समजावीं. ) अर्थाकडे लक्ष दिल्यास ' संरक्ष्यते ' असेंच रूप योग्य दिसेल. पांचव्या व नवव्या ओळींत ' ए ' वर १ हा आंकडा तळटीप दाखविणाऱ्यासारखा छापला आहे. तो ' ए ' च्या पुढें लेखांतला अंक म्हणून घेतला पाहिजे. तसेंच सातव्या ओळींत ' ग ' च्या पुढें ' १ ' हा आंकडा मुळांत आहे. तो छापतांना तळटीपेचा सूचक असा झाला आहे. हे अर्थातच मुद्रणदोष आहेत. ते दुरुस्त करून लेख वाचला पाहिजे. असो.

## कालनिर्णयाचीं प्रमाणें

लेखांत कालनिर्देश नसल्यामुळें त्याचा काल अनुमानानें ठरविला पाहिजे. डॉ. तुळपुळे यांनीं त्याकरितां दोन प्रमाणें दिलीं आहेत. पहिलें प्रमाण अक्षरवटिकेचें. प्रस्तुत लेखांत ए, ओ, च, ण, ब, भ, र, आणि क्ष यांचें वळण जुन्या तऱ्हेचें आहे. विशेषत: ' ए ' या अक्षराचें त्रिकोणाकृतित्व प्रस्तुत लेखाचें प्राचीनत्व सिद्ध करतें, असें ते म्हणतात. पण तें निर्विवाद नाहीं. ' ए ' या अक्षराची डावीकडील वक्ररेषा उजवीकडील दंडापासून वेगळी झालेली अकराव्या शतकांतील कलचुरिकर्णनृपतीच्या बनारस ताम्रपटांत प्रथम आढळते[1]. तथापि त्या अक्षराचें ' त्रिकोणाकृतित्व पुढें दीर्घकाळ टिकलें यांत संशय नाहीं. उदाहरणार्थ, शके ११२८ च्या पाटण येथील शिलालेखाच्या चोवीसाव्या ओळींतील ' एथ'या शब्दांतील ' ए ' अक्षर पहा[2]. पुढें ' ए'च्या डावीकडील वक्ररेषा किंचित् खाली ओढण्याची पद्धत पडली, अशा तऱ्हेचा ' ए ' मी संपादिलेल्या शके १२३२ च्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांत आला आहे.[3] तेव्हां प्रस्तुत शिलालेख शके १०५० च्या सुमाराचा असेलच असें म्हणतां येत नाहीं. याच्या उलट, या लेखांतील ' ज ' चें वळण प्राचीन दिसत नाहीं. बहुतेक ठिकाणी ' ज'च्या उजव्या बाजूला सरळ रेघ आहे. शके १२१२ च्या पूर्वोक्त पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांतहि ' ज'ची उजवी रेषा अशीच वक्र आहे.[4] पाटणच्या शके ११२८ च्या लेखाच्या २१ ते २६ ओळींचा ठसा कै. भावे यांच्या महाराष्ट्र-सारस्वतांत ( पहिली आवृत्ति पृ. १२ )

१ कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम्, इंडिकॅरम्, पु. ४, प्लेट ३८, ओळ २८.

२ महाराष्ट्रसारस्वत ( प्रथमावृत्ति ), पृ. १२ वरील ठसा पहा.

३ एपिग्राफिया इंडिका, पु. २५, पृ. २१६ समोरील प्लेट, ओ. ९१ पहा.

४ पूर्वोक्त, पृ. २१०, समोरील प्लेट, ओळ ३ पहा.












दिला आहे. त्यांतील ' ज 'चें वळण प्रस्तुत लेखांतील ' ज ' पेक्षां प्राचीन दिसतें. तेव्हां ' ज'च्या आकृतीवरून प्रस्तुत लेख शके १०५० इतका जुना वाटत नाहीं.

## सोमेश्वराचा निर्देश

आतां ' सोमेश्वरा'च्या निर्देशाकडे वळूं. प्रस्तुत लेखाच्या आरंभीच्या श्लोकांत ' तस्मिन्नेव ( प्रतिष्ठानके ) सोमेश्वरो राजते ' असें म्हटलें आहे. पुढें तिसऱ्या ओळींत ' सोमेस्वरुस्वामीआ ' असाहि निर्देश आला आहे. या दोन्ही ठिकाणीं प्रतिष्ठानमध्यें राज्य करणाऱ्या सोमेश्वर नृपतीचा उल्लेख आहे आणि अक्षरवटिका व भाषा यांवरून प्रस्तुत लेख जुना दिसत असल्यानें हा सोमेश्वर म्हणजे उत्तरचालुक्य वंशांतील तृतीय सोमेश्वर-भूलोकमल्ल (शके १०४८–१०६०) असावा असें अनुमान डॉ. तुळपुळे यांनीं केलें आहे. प्रस्तुत लेखांत सोमेश्वराच्या जगतींतील म्हणजे आवारांतील कांहीं देवस्थानांचा निर्देश आहे. ' हीं देवस्थानें सोमेश्वरनृपतीच्या पैठण येथील प्रासादाच्या आवारांतील असावीं. सोमेश्वर हें देवाचें नांव असणें शक्य दिसत नाहीं, कारण या नांवाचें देवस्थान महानुभावांच्या स्थानपोथींत जे पैठणच्या देवस्थानांचे उल्लेख आले आहेत त्यांमध्यें आढळत नाहीं ' असें डॉ. तुळपुळे म्हणतात. त्याचा आतां विचार करूं.

प्रस्तुत लेखांत उल्लेखिलेले सोमेश्वर व सोमेश्वरस्वामी हे एकच असावेत यांत संशय नाहीं. परंतु हा सोमेश्वर चालुक्यवंशी नृपति मानल्यास त्याच्या विरुदांचा कोठेंच उल्लेख कसा नाहीं अशी शंका सकृद्दर्शनींच येते. ह्या तृतीय सोमेश्वर – भूलोकमल्लाची राजधानी कानडी मुलुखांत कल्याणी येथें होती. त्यामुळें याचे स्वतःचे सर्व लेख त्याच्या पूर्वजांच्या लेखांप्रमाणें कानडी मुलखांतच सांपडले आहेत. या राजाचा प्रासाद पैठण येथें होता व त्याच्या आवारांत त्यानें अनेक देवालयें बांधलीं होतीं असें मानण्यास कांहीहि प्रमाण नाहीं. या उत्तर चालुक्यांचीं ' समस्त भुवनाश्रय, श्रीपृथिवीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक, सत्याश्रयकुलतिलक, चालुक्याभरण, श्रीमत्प्रतापचक्रवर्ति ' इत्यादि विरुदें त्यांच्या कानडी लेखांत उल्लेखिलेलीं आढळतात. मराठी लेखांत अशीं विरुदें लिहिण्याचा प्रघात नव्हता असेंहि नाहीं. कारण, या चालुक्यानंतर महाराष्ट्रांत ज्यांचें साम्राज्य झालें त्या देवगिरीच्या यादवांच्या कालच्या मराठी लेखांत त्यांचीं विरुदें लिहिलीं आहेत. तेव्हां स्वतः तृतीय सोमेश्वरानें कोरविलेल्या व त्याच्या प्रासादाच्या आवारांतील देवस्थानांना दिलेल्या देणग्यांचें वर्णन असलेल्या लेखांत त्याचें राजत्वनिदर्शक एकहि विरुद उल्लेखिलें जाऊ नये हें विलक्षण वाटतें. तेव्हां सोमेश्वर किंवा सोमेश्वरस्वामी हें राजाचें नांव दिसत नाहीं. अत्यंत प्राचीन कालीं ' राजा ' या अर्थी स्वामी या शब्दाचा उपयोग केला जात असे खरा, पण राजाच्या नांवापुढें स्वामी लावलेलें आढळत नाहीं. याच्या उलट ' स्वामी ' हें पद ब्राह्मणांच्या व देवांच्या नांवापुढें लावण्याचा प्रघात होता. उदाहरणार्थ, वाकाटकांच्या ताम्रपटांतील चनालस्वामी, सूर्यस्वामी इत्यादि ब्राह्मणांची नांवें पहा. अशा तऱ्हेचीं नांवें इतर राजवंशांच्याहि लेखांत येतात. किंबहुना ' स्वामिपदान्त विद्वान् ब्राह्मणांचीं नांवें प्राचीन ग्रंथांत व लेखांतच येतात. ई. स. च्या तेराव्या शतकानंतरच्या ग्रंथांत व लेखांतच तीं सहसा आढळत नाहींत ' असें डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांनीं म्हटलें आहे. तथापि प्रस्तुत लेखांतील वर्णनावरून सोमेश्वरस्वामी हें कोणा ब्राह्मणाचें नांव असेलसें वाटत नाहीं. पण तें देवनाम असणें सुतराम् शक्य आहे. प्राचीन काळच्या अनेक लेखांत अशी स्वामिपदान्त देवनामें आढळ-

५ एपिग्राफिया इंडिका, पु. ५ पृ. १८.








तात. सामान्यत: शिवाची नामें ईश्वरपदान्त असत. उदाहरणार्थ, सोमेश्वर, अलङ्ध्येश्वर, नोहलेश्वर, वप्पुलेश्वर, भीमेश्वर, हाटकेश्वर, पृथ्वीदेवेश्वर रत्नेश्वर, वङ्केश्वर, ही कलचुरींच्या कोरीव लेखांतील शंकरांचीं नांवें पहा. याच्या उलट विष्णूच्या नांवाच्या शेवटीं 'स्वामिन्' हें पद लावण्याचा प्रघात होता. उदाहरणार्थ, वाकाटकांच्या ऋद्धपुरताम्रपटांतील रामगिरिस्वामी (रामटेकवरील श्रीरामचंद्र ) गुप्तांच्या दामोदरपूर ताम्रपटांतील श्वेतवराहस्वामी, कलचुरींच्या कारीतलाईन लेखांतील सोमस्वामी हीं विष्णूच्या अवतारांचीं नांवें पहा. तेव्हां सोमेश्वर स्वामी हें विष्णूचें नांव दिसतें. अर्थातच हें नांव सोमेश्वर नामक कोणा गृहस्थानें देऊळ बांधवून त्यांत प्रतिष्ठापना केलेल्या देवाला दिलेलें दिसतें. प्राचीन काळीं लोक आपल्या नांवाच्या शेवटीं ईश्वर किंवा स्वामी हें पद लावून झालेलें नांव आपण प्रतिष्ठापना केलेल्या देवाला ठेवीत असत. उदाहरणार्थ, प्रवरेश्वर, रत्नेश्वर, पृथ्वीदेवेश्वर, सोमस्वामी ( कलचुरि द्वितीय लक्ष्मणराजाच्या सोमेश्वर मन्त्र्यानें कारीतलाई येथें स्थापलेला वराह ) इत्यादि. याशिवाय हेंहि लक्षांत घेणें जरूर आहे कीं प्रस्तुत लेखांत उल्लेखिलेलीं सोमेश्वरस्वामींच्या आवारांतील इतर देवांचीं नांवें विष्णूचींच द्योतक आहेत— उदाहरणार्थ, सोढलनारायण, वेसुनारायण, म्हातूनारायण हीं नांवें पहा. यांच्या शेवटीं 'नारायण'पद आहे तें विष्णूचें वाचक आहे. प्राचीनकाळीं विष्णूचे उपासक स्वतःच्या नांवाच्या शेवटीं 'नारायण'पद जोडून बनविलेलें नांव स्वतः प्रतिष्ठापिलेल्या विष्णूच्या मूर्तीला ठेवीत असत. या तऱ्हेचीं इन्द्रनारायण, शंकरनारायण इत्यादि नांवें कोरीव लेखांत येतात. त्या तऱ्हेचीच हीं सोढलनारायण, वेसुनारायण इत्यादि नांवें दिसतात. सोढल हें व्यक्तिनाम आहे. संस्कृत वाङ्मयांत उदयसुंदरीकथेचा कर्ता सोढल हा सुविख्यात आहे. वेसु व म्हातु हींहि अशींच व्यक्तिनामें दिसतात.

### कांहीं शब्दांचे अर्थ

आतां प्रस्तुत लेखांत आलेल्या कांही शब्दांच्या अर्थांचा विचार करूं. कामतसेतु ए १ ( ओ. ५ ), जांबुआलीए १ स्थावर ( ओ. ९ ), आणि दीवीए संबंध वाडुए १ ( ओ ९ ), यांतील 'ए'च्या अर्थाविषयीं डॉ. तुळपुळे यांनी संशय दाखविला आहे. पण तो ' कविठीए ' ( ओ. ४ ) यांतल्याप्रमाणें षष्ठीचा किंवा सप्तमीचा प्रत्यय दिसतो. मी संपादिलेल्या कृष्णदेव यादवाच्या काळच्या नांदगांवच्या शिलालेखांत ' लाषौलीए ' किंवा ' लाषौए ग १ ' हे शब्द ' फुलांच्या लाखोलीकरितां दिलेलें गद्याणक ' या अर्थी योजिले आहेत. पूर्वोक्त कामतसेतुए १ इत्यादिकांचा अर्थ कामतसेतूकरितां ( शेतांत जाण्याच्या वाटेकरितां ) एक निवर्तन इत्यादि अर्थ विवक्षित दिसतो. ' टाकलीए वॉटॉ भूमीशतें ३०० ' याचा अर्थ ' टाकलीच्या वाटेवर ३०० निवर्तनें भूमि ' असा असावा. येथ ' भूमीशतें ३ ' किंवा 'भूमि ३०० ' असें असावयास पाहिजे होतें. ' शतें ' पद अनावश्यक आहे. कालाचा उल्लेख करतांना अशा तऱ्हेचीं अनावश्यक पदें कांही ठिकाणीं योजिलेलीं प्राचीन कोरीव लेखांत आढळतात. त्यांतलाच हा प्रकार दिसतो.

डॉ. तुळपुळे यांच्या या लेखाच्या वाचनांत व विशेषतः त्याचा कालनिर्णय करण्यांत व अर्थ लावण्यांत अग्राह्य असा कांही भाग आम्हांस वाटत असला तरी त्यांनीं प्रथमच प्रकाशित केलेला हा लेख महत्त्वाचा आहे यांत संशय नाहीं. प्राचीन लेखांचें वाचन करून अर्थ लावणें फार जिकीरीचें काम असतें व त्यांत मतभेदास पुष्कळ अवकाश असतो, म्हणून वरील सूचना केल्या आहेत. त्यांचा त्यांनीं विचार करावा असें सुचवून प्रस्तुत विषयाची रजा घेतों.

---

६ पूर्वोक्त, पु. २७, पृ. ११.








प्रा. ए. रा. धोंगडे

# दशमान नाणें-पद्धति

सप्टेंबर १९५५ मध्यें आपल्या नाणेंपद्धतींत दुरुस्ती करणारा कायदा संसदेनें पास केला. या कायद्यान्वयें भारतांत दशमान नाणेंपद्धती सुरू करण्याचा अधिकार मध्यवर्ती सरकारकडे सोंपविण्यांत आला आहे. हा कायदा १ एप्रील १९५७ पासून अमलांत येईल व त्या दिवसापासून नवीं नाणीं व्यवहारांत वापरण्यास सुरवात होईल असें सरकारनें जाहीर केलें आहे. प्रत्येक व्यक्तिमात्रास नाण्यांचा उपयोग रोजच्या व्यवहारांत करावाच लागतो. त्यामुळें नाणें-पद्धतींतील ही सुधारणा महत्त्वपूर्ण आहे यांत शंका नाहीं. या सुधारणेमुळें घडून येणारा बदल व तिचें दूरगामी स्वरूप यांची पुरेशी जाणीव अद्याप सामान्य जनतेस झालेली आढळत नाहीं. असें असलें तरी जनतेच्या सहकार्याशिवाय ही सुधारणा सुकर होणें शक्य नाहीं. म्हणूनच या नव्या नाणें-पद्धतीचें स्वरूप काय आहे, तीपासून कोणते फायदे संभवतात व ही पद्धत आपण आतांच कां म्हणून स्वीकारावी हें आपण समजून घेतलें पाहिजे.

## दशमान नाण्यांचा वापर

आज जगांतील जवळ जवळ १४० देश स्वतःचीं नाणीं वापरतात; त्यांपैकीं १०५ देशांतील नाणीं दशमान स्वरूपाचीं आहेत. उदाहरणार्थ, फ्रान्स, जर्मनी, स्कँडिनेव्हीआ, हंगेरी, रशिया, जपान व अमेरिका हीं राष्ट्रें दशमान नाणींच वापरतात. दशमान नाणीं वापरणाऱ्या या राष्ट्रांच्या मालिकेंत भारतहि पुढील एप्रिलपासून समाविष्ट होईल. दशमान पद्धत वापरून संख्या लिहिण्याचा परिपाठ भारतानेंच प्रथम सर्व जगास घालून दिला व त्यायोगें अंकगणितांतील एक मोठीच अडचण दूर केली. अशा आपल्या देशांतील नाणींहि दशमानरूपी असावीं हें योग्यच होय. किंबहुना दशमान नाणेंपद्धतीचा स्वीकार हें भारताच्या आंतरराष्ट्रीयत्वाचें एक प्रतीकच आहे असें म्हणणें वावगें होणार नाहीं.

## ऐतिहासिक पार्श्वभूमि

कोणी असें म्हणतील कीं नाण्यांतील हा बदल असा अकस्मात व घाईघाईनें करणें बरें नव्हे. परंतु हें धोरण पूर्ण विचाराअंतींच निश्चित करण्यांत आलें, व त्याच्यामागें बराच इतिहास आहे. भारतासारख्या पुराणप्रिय देशांत पुरातन रूढि बदलणें किती कठीण असतें याची जाणीव सर्वांसच आहे. तेव्हां दशमानपद्धती प्रथम सुचविण्यांत आल्यांपासून तिचा स्वीकार निश्चित होईपर्यंत बराच कालावधी लोटावा यांत मुळींच आश्चर्य नाहीं. मापें व वजनें दशमान असावीं यासाठीं हिंदुस्थान सरकारनें १८६७ मध्यें प्रयत्न सुरू केले व त्यांना १८७० व १८७१ च्या मेट्रिक कायद्यांचें स्वरूपहि प्राप्त झालें. परंतु अनेक कारणांस्तव १८७१ चा मेट्रिक कायदा अमलांत येऊं शकला नाहीं. १९०१ च्या सुमारास सरकारनें असें ठरविलें कीं ब्रिटनमध्यें दशमान पद्धती अमलांत आल्याशिवाय तिचा स्वीकार हिंदुस्थानचे व्यवहारांत करणें योग्य होणार नाहीं. नंतर जेव्हां देशांतील निरनिराळया भागांतील मापें व वजनें यांच्या विभिन्नतेमुळ होणाऱ्या अडचणी विशेष जाणवूं लागल्या, तेव्हां त्यांचेमध्यें एकसूत्रता आणावी याबद्दल जनमत जागृत झालें. तदनुसार मध्यवर्ती सरकारनें वजनांच्या प्रमाणांत एक कायदा १९३९ मध्यें केला

परंतु तोहि दशमान पद्धतीवर आधारलेला नव्हता. १९४४ त भारतीय दशमान संस्था ( Indian Decimal Society ) अस्तित्वांत आली व तिनें दशमान पद्धतीचा आग्रह धरला. फेब्रुआरी १९४६ त मध्यवर्ती कायदेमंडळांत सरकारनें दशमान नाणेंपद्धतीचा पुरस्कार करणारें एक बिल मांडलें. या बिलान्वयें रुपयाचे १०० सेंट असावेत व रुपया व सेंट हींच नाणीं व्यवहारांत असावींत असें सुचविलें होतें. भारतीय विज्ञान सभेनें ( Indian Science Congress ) आपल्या १९४६ च्या वार्षिक अधिवेशनांत या बिलाबद्दल समाधान व्यक्त केलें. परंतु काळ आला तरी वेळ आली नव्हती या न्यायानें त्यावेळच्या राजकीय घडामोडींमुळें या बिलाची गति कुंठित झाली व अखेर तें जागींच राहिलें. १९४७ मध्यें भारतीय प्रमाणसंस्था (Indian Standards Institution) स्थापन झाली व तिनेंहि दशमानपद्धतीकडे विशेष लक्ष पुरविलें. तिच्या याबाबतच्या समितीनें अशी शिफारस केली कीं मापें व वजनें दशमान पद्धतीचीं करण्यापूर्वी दशमान नाणेंपद्धती अमलांत आणणें श्रेयस्कर होईल. म्हणून मध्यवर्ती सरकारनें त्यासाठीं जरूर ते उपाय योजावेत असाहि समितीनें आग्रह धरला. त्यानंतर सरकारी व बिनसरकारी गोटांमधून दशमान पद्धतीस अधिकाधिक पाठिंबा मिळूं लागला व अखेर सप्टेंबर १९५५ मध्यें १९०६ च्या नाणेंकायद्यांत दुरुस्ती करणारा कायदा पास झाला.

## नाण्यांचें स्वरूप

हा नवीन कायदा १ एप्रिल १९५७ पासून अमलांत येईल व तेव्हांपासून सर्व सरकारी हिशेब नव्या नाणेंपद्धतीनुसार करण्यांत येतील. या कायद्यानें रुपयाचे १०० हिस्से करण्यांत आले आहेत. रुपयाच्या शंभराव्या हिश्श्यास ‘ नवा पैसा ’ असें संबोधण्यांत येईल. संक्रमणकालांत जुने पैसेहि व्यवहारांत चालूं राहतील व त्यामुळें घोंटाळा होऊं नये म्हणून नवीन नाण्यास ‘ नवा पैसा ’ असें म्हणावें लागेल. सुमारें तीन वर्षांचे कालावधींत सर्व जुने पैसे काढून घेण्यांत आल्यानंतर फक्त नवीं नाणींच व्यवहारांत राहतील व तसें झालें म्हणजे नव्या नाण्यास ‘ नवा पैसा ’ असें न संबोधतां केवळ ‘ पैसा ’ असें म्हणतां येईल. नव्या पद्धतीनुसार १ नवा पैसा व २, ५, १०, २५, ५० आणि १०० नवे पैसे ( म्हणजेच रुपया ) हीं वेगवेगळीं नाणीं अमलांत येतील. १ एप्रिल १९५७ ला फक्त १ नवा पैसा, व २, ५ आणि १० नवे पैसे हीं नाणींच व्यवहारांत वापरण्यास सुरुवात होईल. २५, ५० व १०० नवे पैसे या नाण्यांचा वापर कांहीं काळानंतर सुरू केला जाईल; तोंपर्यंत त्यांचे ऐवजीं हल्लींचीं पावली, अधेली व रुपया हीं नाणींच वापरांत चालूं राहतील. नव्या नाण्यांच्या दर्शनी भागावर अशोकस्तंभाचें चिन्ह व हिंदीमध्यें ‘ भारत ’ आणि इंग्रजींत ‘ India ’ हे शब्द असतील. त्यांचे मागील बाजूवर आंतरराष्ट्रीय आंकड्यांत तें नाणें किती नव्या पैशाचें आहे तें, त्याचा रुपयाशीं काय संबंध आहे तें व नाणें घडाईचें वर्ष दर्शविण्यांत येईल. उदाहरणार्थ, १ नवा पैसा या नाण्याचें मागील बाजूवर ‘ रुपये का सौ वाँ भाग ’ हे शब्द असतील. १ नवा पैसा हें नाणें ब्रांझचें, २, ५ व १० नवे पैसे हीं नाणीं कुप्रोनिकलचीं ( म्हणजे ७५ % तांबें व २५ % निकल अशा मिश्रधातूंचीं ), व २५, ५० आणि १०० नवे पैसे हीं नाणीं शुद्ध निकलचीं घडविण्यांत येतील. शुद्ध निकलच्या नाण्यांच्या मागील बाजूवर धान्यांच्या कणसांचें चित्रहि असेल.

## सोयीसाठीं कोष्टकें

नव्या नाण्यांचा वापर सोईचा व्हावा म्हणून कांहीं कोष्टकें तयार करण्यांत आलीं आहेत व तीं सगळीकडे पुरविलीं जातील. आणे व पै यांचे पैसे करण्यासाठीं एक कोष्टक असून दुसऱ्या एका संक्षिप्त










कोष्टकावरून आणे व पैसे यांचें नव्या पैशांत रूपांतर करतां येईल. या कोष्टकांचा रोजच्या व्यवहारांत फार उपयोगी होईल. नव्या नाण्यांची माहिती जनतेस मिळावी यासाठीं शिक्षणाच्या सर्व साधनांचा उपयोग करून नव्या पद्धतीचें ज्ञान सर्वांस पुरविण्याची व्यवस्था करणें जरूर आहे. ही माहिती निरनिराळ्या प्रांतीय भाषांतून दिल्यास नाणेंपद्धतींतील हा बदल लोकांचे चटकन् ध्यानीं येईल व त्यांचें सहकार्य मिळणें सोपें होईल. देशांतील निरक्षरतेचें प्रमाण लक्षांत घेतां नवीन नाण्यांचें ज्ञान निरक्षर लोकांस करून देण्यासाठीं खास प्रयत्न करणें किती जरूर आहे व त्यासाठीं खेडोपाडीं प्रचार करणें किती आवश्यक आहे हें सहज समजून येईल. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत राष्ट्रीय विकास कार्याचें क्षेत्र सर्व खेडूतांपर्यंत पोचविण्याचें योजिलें आहे. त्यामुळें नवीन नाण्यांची ओळख सर्व खेडूतांना करून देण्यासाठीं या विकास-संस्थांचा उपयोग करून घेतां येईल.

## एप्रिलपासून होणारे बदल

टपाल व तार खात्याला हल्लींच्या तिकिटांचे ऐवजीं नव्या पैशाचीं तिकिटें काढावीं लागतील. कार्डें, पत्रें, रजिस्टर्ड वस्तू इत्यादींचें नव्या पैशांतील दरांसंबंधी एक बिलहि पार्लमेंटनें पास केलें आहे. १ एप्रिल १९५७ पासून रेल्वेचे उतारूंच्या तिकिटांचे दरहि नव्या पैशांत आकारण्यांत येतील. मालवाहतुकीचे दर मात्र कांहीं काळ जुन्या पद्धतीनुसारच आकारले जातील. अलीकडे या दरांसंबंधींचें चौकशीचें काम एका समितीकडे दिलें होतें. तिच्या शिफारसींनुसार जेव्हां मालवाहतुकीचे दरांत फेरफार करण्यांत येतील त्यावेळीं दरांच्या आकारणीचें कोष्टक नव्या पैशांत तयार केलें जाईल. हीं नवीं नाणीं घडविण्याची जबाबदारी मुख्यत्वें अलिपूर (कलकत्ता), मुंबई व हैद्राबाद येथील टांकसाळींवरच पडेल व त्यांचें हें काम सुरूंहि झालें आहे. नाणें पाडणें हें फार अवघड काम आहे व त्यासाठीं शास्त्रीय पद्धतीचा अवलंब करावा लागतो. भारतांतील विस्तृत प्रमाणांवरील लोकसंख्येस लागणाऱ्या नाण्यांची संख्या लक्ष्यांत घेतां टांकसाळींचें काम कांहींसें बिकटच आहे हें उघड होय. तरीपण अलिपूर व मुंबई येथील मोठ्या टांकसाळी या कामासाठी सुसज्ज आहेत व त्या आपली जबाबदारी यशस्वीरीत्या हाताळतील असें टांकसाळतज्ज्ञांचें मत आहे.

नाणेंपद्धत बदलतांना सुरुवातीस कदाचित् कांहीं अडचणी येतील; परंतु सर्वांनीं आपआपलें काम योग्यवेळीं व तत्परतेनें पार पाडल्यास व जनतेचें सहकार्य मिळाल्यास ही सुधारणा यशस्वी होणें फारसें अवघड नाहीं. अद्याप हिंदुस्थानांत नाणीं टाकून वस्तू विकत घेण्याचीं स्वयंचलित यंत्रें फारशीं प्रचलीत नसल्यामुळें त्या यंत्रकारांचा नव्या नाण्यांना विरोध होण्याची भीति नाहीं, हें एका अर्थी बरें; कारण अशा प्रकारच्या विरोधामुळें दशमान पद्धतीच्या प्रगतीस इंग्लंडसारख्या देशांत आज बरीच अडचण भासत आहे.

## दशमान पद्धतीचे फायदे

अखिल जगांत आंकडेमांडणीची पद्धत दशमान स्वरूपाचीच आहे; तेव्हां नाणेंपद्धतीसहि हें स्वरूप मिळाल्यास पैशाचे सर्व हिशेब सोपे होतील. आधुनिक व्यापारामध्यें सोप्या व जलद करतां येणाऱ्या हिशेबपद्धतींना फार महत्त्व आहे व दशमान पद्धतीची सरलता व सोपेपणा हींच वैशिष्ट्यें आहेत. सिलोन, चीन, इराक, पॅलेस्टाइन, इंडोनेशिआ व थायलंड हे सर्व देश दशमान नाणींच वापरतात व या पौर्वात्य राष्ट्रांप्रमाणेंच हिंदुस्थानांतहि दशमान नाणीं असणें योग्य होईल. दशमान नाणेंपद्धतीमुळें हिशेब सोपे व झटपट होतील. पैसे व पै हीं नाणीं जाऊन त्यांचे जागीं एकच सोपें नाणें- 'नवा पैसा' हें उपयोगांत येईल. विशेष महत्त्वाचा फायदा हा कीं, शालेय विद्यार्थ्यांना देशी












नाण्यांचीं विविध कोष्टकें लक्ष्यांत ठेवण्याचा शीण आतां पडणार नाहीं व त्यासाठीं खर्च होणारा वेळ व घ्यावे लागणारे श्रम दुसऱ्या गोष्टींसाठीं वापरतां येतील. भारतांतील सर्व व्यवहारांत दशमान पद्धती अवलंबिण्याचे मार्गावरील पहिला टप्पा या दृष्टीनें दशमान नाण्यांचा हा प्रयोग सर्वांचेंच लक्ष वेधून घेईल यांत शंका नाहीं.

### पद्धतींतील लवचिकपणा

दशमान नाणीं जरी आपण स्वीकारीत आहोंत तरी हें दशमानतत्त्व अगदीं तंतोतंत पाळण्याच्या हट्टास आपण बळी पडत नाहीं हें एका दृष्टीनें सोईचें आहे. तात्त्विक दृष्टया दशमान नाणें-पद्धतींत प्रमाणीभूत असें एक नाणें व त्याच्या दसपट, शतपट व सहस्रपट किंमतींचीं भारी नाणीं किंवा त्याच्या एकदशांश, एकशतांश आणि एकसहस्रांश किंमतीचीं लहान नाणीं हींच काय तीं वापरांत असूं शकतात. आपल्या नव्या नाणावळींत १ नवा पैसा, १० नवे पैसे व १०० नवे पैसे (= १ रुपया) हीं नाणीं दशमान तत्त्वानुसार असलीं, तरी २,५,२५ व ५० नवे पैसे हींहि अदश स्वरूपाचीं नाणीं असणार. व्यावहारिक सोईसाठीं व पावली, अधेलीसारख्या जुन्या नाण्यांचा वापर कांहीं दिवस करतां यावा म्हणून हीं अदश नाणींहि आपण ठेवणार आहोंत. असें करण्यांत आपण कोठलाच नवीन पायंडा घालीत नसून फ्रान्स, जर्मनी व अमेरिका यांचेप्रमाणेंच दशमान पद्धतींत थोडासा लवचिकपणा ठेवल्यास तिचा व्यवहारांत ज्यास्त उपयोग होऊं शकतो या तत्त्वप्रणालीस उचलून धरीत आहोंत.

### विरोधांत तथ्य नाहीं

दशमान नाणेंपद्धतीस हिंदुस्थानांत कांहीं विरोधाचे सूरहि निघाले. या पद्धतीची आपल्या लोकांस माहिती नसल्यामुळें तिचा प्रसार होऊं शकणार नाहीं असें कांहींचें म्हणणें पडलें. या म्हणण्यांत विशेष तथ्य दिसत नाहीं. लोकांना या पद्धतीची माहिती करून देतां येईल व त्यांचें अज्ञान दूर करतां येईल. शिवाय एकदां ही दशमान पद्धती अमलांत आली कीं तिचा प्रसार व्यापारामुळें आपोआपच देशाच्या सर्व भागांत होईल. विरोधकांचा दुसरा एक मुद्दा असा होता कीं वजनें आणि मापें जोंपर्यंत दशमानपद्धतीचीं नाहींत तोंपर्यंत नाणेंपद्धतीस दशमानरूप देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. याला उत्तर असें कीं, आजहि असे अनेक देश आहेत कीं ज्यांचीं मापें व वजनें दशमान नसतांनासुद्धां नाणेंपद्धती मात्र दशमानरूपी आहे—उदाहरणार्थ, युनायटेड स्टेट्स, कॅनडा, सिलोन व ब्रह्मदेश. तेव्हां दशमान नाणेंपद्धतीचेहि स्वतंत्र असे कांहीं फायदे आहेतच. ती पद्धत साधी, सोपी व सोईची आहे. प्रथम ती अमलांत आणून नंतर मेट्रिकपद्धती हळूहळू इतर व्यवहारांत आणणें हें केव्हांहि सयुक्तिक ठरेल. शिवाय असा एकहि देश नाहीं कीं जेथें दशमान नाणेपद्धती एकदां अमलांत आल्यावर ती टाकून देण्यांत आली. यावरूनच तिची उपयुक्तता निर्विवाद सिद्ध होते हें उघड होय. आपल्या देशाचा विस्तार व लोकसंख्या लक्ष्यांत घेतां नाणेंपद्धती बदलतांना कांहीं अडचणी येतील हें खरें. स्वतंत्र भारतानें संस्थानांचें विलिनीकरण, पुनर्वसाहत व राज्यपुनर्घटना यासारखे कठीण प्रश्न लोकशाही पद्धतीनें हाताळले आहेत. तेव्हां दशमान नाणेंपद्धतीची उपयुक्तता पटल्यावर ती अमलांत आणतांना येणाऱ्या सर्व अडचणींस तोंड देण्यास भारत समर्थ आहे असें म्हणणें चुकीचें होणार नाहीं. नाणेंपद्धतींतील ही सुधारणा १ एप्रील १९५७ ला अमलांत येईल. तो दिवस भारताच्या नाण्यांच्या इतिहासांतील एक महत्त्वाचा टप्पा समजला जाईल हें उघड आहे.

१ नभोवाणीच्या मुंबई केंद्राच्या सौजन्यानें.







प्रा. वी. डी. महाजन

# यूनोच्या सनदेचा फेरविचार

पहिलें जागतिक महायुद्ध जर राष्ट्रसंघा-( League of Nations ) चें जनक समजलें तर दुसरें जागतिकमहायुद्ध यूनो-( Uno ) चें जनक समजलें पाहिजे. भीति आणि आशा यांच्या वातावरणांत अग्नीचा वर्षाव, गोळयांचा भडिमार आणि बॉम्बचा धूमधडाका चालू असतांना यूनोचा जन्म झाला. हिरोशिमा आणि नागासाकी ह्या जपानमधील शहरांवर पहिल्याप्रथम जेव्हां बॉम्ब-हल्ला झाला त्याच्या आधीं सहाच आठवडे अगोदर यूनोची घटना सान्फ्रान्सिस्को येथें बनविण्यांत आली होती. सान्फ्रान्सिस्को येथें हा मसुदा ज्यावेळीं तयार करणेंत आला त्यावेळची परिस्थिति जर लक्षांत घेतली तर असें म्हणावें लागेल कीं, युद्धांत गुंतलेल्या बहुतेक राष्ट्रांना युद्धाचा कंटाळा आलेला होता, क्षणार्धांत होणारी लाखों मनुष्यांची हानि बघून आश्चर्याचा आणि निराशेचा जबर धक्का बसला होता, राष्ट्रांराष्ट्रांत जें तेढीचें व भीतीचें वातावरण वाढलें होतें त्याचा मनस्वी तिटकारा उत्पन्न झाला होता. सर्वांना शांतता हवी होती. राष्ट्रसंघांतील उणीवांची जाणीव सर्वांना झालेली होती. कोणतीहि आंतरराष्ट्रीय संघटना चीन, रशिया, इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स ह्या प्रबल राष्ट्रांच्या सहकार्याशिवाय कार्यक्षम होणार नाहीं हें सर्वांना पटलेलें होतें. लहानमोठ्या सर्व राष्ट्रांना आपली सार्वभौम सत्ता ( Sovereignty ) मर्यादित नसावी हेंच तत्त्व अजून मान्य होतें. अशा परिस्थितींत युनोची सनद तयार झाली व तिला २४ आक्टोबर १९४५ रोजीं आंतरराष्ट्रीय कायद्याचा एक भाग म्हणून राष्ट्रांनीं मान्यता दिली.

## फेरविचाराची जरूरी

अशा परिस्थितींत तयार झालेली यूनोची सनद म्हणजे तर्कशुद्ध व सुसंबद्ध असें एक विधेयक नसून निरनिराळया राष्ट्रांराष्ट्रांतील मतभेदांमधूनच जास्तींत जास्त गोष्टीवरील एकमताचा आविष्कार होय. अर्थातच अशा सनदेमध्यें बऱ्याच ठिकाणीं असंबद्धता, अस्पष्टता जी आढळते ती साहजिकच आहे. यूनोच्या उद्दिष्टांच्या बाबतींत निरनिराळया राष्ट्रांमध्यें जी एकवाक्यता दिसून येते ती तीं उद्दिष्टें सफल करण्याकरितां योजिल्या जाणाऱ्या मार्गाच्या व इतर तपशीलाच्या बाबतींत मात्र दिसून येत नाहीं. राष्ट्रांतील अंतर्गत बाबतींत जो लोकशाहीचा मार्ग व लोकशाहीचें तत्त्व अवलंबिलें तेंच तत्त्व व तोंच मार्ग तितक्याच कांटेकोरपणानें आंतरराष्ट्रीय संघटनेला लागू करणें जरी शक्य नसलें तरी त्या दृष्टीनें प्रयत्न झाले तर विशेष चांगलें होणार आहे.

यूनोसंघटना ज्या उद्दिष्टांकरतां अस्तित्वांत आली तीं उद्दिष्टें बऱ्याच अंशीं असफल झालेलीं दिसून येतात, ती असफल होण्याचीं कारणें जरी बरींच असलीं तरी यूनोच्या सनदेमध्यें जे कांही दोष राहून गेले ते जर कमी झाले तर यश प्राप्त होण्याची शक्यता बऱ्याच अंशीं वाढेल. त्याचप्रमाणें बदलत्या परिस्थितीबरोबर सनदेमध्यें जर बदल घडवून आणले नाहींत तर ही आंतरराष्ट्रीय संघटना मोडण्याची सुद्धां भीति आहे. म्हणून ह्या प्रश्नाचा विचार प्रत्येक सभासद-राष्ट्रानें करणें निकडीचें आहे. १९४५ सालापेक्षां आजची परिस्थिति बऱ्याच दृष्टीनें बदललेली आहे. जीं राष्ट्रें यूनो अस्तित्वांत आली त्यावेळीं प्रबल होतीं त्यांपैकीं कांहीं

राष्ट्रांचें आंतरराष्ट्रीय महत्त्व कमी झालेलें दिसून येतें. व जीं राष्ट्रें त्यावेळीं आंतरराष्ट्रीय दृष्ट्या कमी महत्त्वाचीं वाटत होतीं त्यांपैकीं कांहीं राष्ट्रें आज आंतरराष्ट्रीय शांतता टिकविण्याच्या दृष्टीनें महत्त्वाची ठरलीं आहेत. बदलत्या राजकीय परिस्थितीबरोबर घटनेनें पण आपलें पाऊल ठेवून साथ करावी, त्याच दृष्टीनें यूनोच्या सनदेमध्यें कलम नं. १०८ व १०९ समाविष्ट केलेलें आहे. कलम १०९ (३) प्रमाणें ' ही सनद अंमलांत आल्यापासून आमसभे-( General Assembly )ची दहावी वार्षिक सर्वसाधारण परिषद् भरण्याची वेळ येईपर्यंतच्या कालांत एकदांहि जर ( सनदेचा फेरविचार करण्यासाठीं परिषद् ) अशी परिषद भरविली गेली नाहीं तर, अशी परिषद भरविण्याबद्दलची सूचना त्या दहाव्या वार्षिक परिषदेच्या कार्यक्रमपत्रिकेंत पुढें मांडली जाईल आणि आमसभेंतील सभासदांच्या साध्या बहुमतानें व सुरक्षामंडळां-( Security Council ) मधील कोणाहि सात सभासदांच्या मतानें तशी परिषद् भरूं शकेल असें स्पष्ट ठरलेलें आहे. आज यूनो स्थापन होऊन दहा वर्षें पूर्ण झालीं आहेत. त्यामुळें यूनोच्या सनदेचा फेरविचार करण्याचा प्रश्न प्रामुख्यानें सभासदराष्ट्रांपुढें आहे.

यूनोचा फेरविचार करतांना आपण पुढील गोष्टी ध्यानांत ठेवल्या पाहिजेत : ( १ ) जे कांही बदल अगर दुरुस्त्या सनदेमध्यें व्हाव्यात असें आपणांस वाटतें त्या सर्वांचा हेतु यूनोची संघटना जास्त मजबूत व कार्यक्षम कशी होईल हा असावा. नाहींतर फाजील उत्साहामुळें अगर अट्टाहासामुळें यूनोचें अस्तित्वच नष्ट होण्याकडे त्यांचें पर्यवसान होत जाईल. अशा आंतरराष्ट्रीय संघटनेची गरज जी १९४५ सालीं राष्ट्रांना होती त्यापेक्षां आज जास्तच आहे; ही गोष्ट केव्हांहि विसरतां कामा नये. आजच्या परिस्थितींत तिसरें जागतिक महायुद्ध जर पेटलें तर त्यापासून सर्व प्राणिमात्रांस व वनस्पतीस धोका आहे. ह्याचा खात्रीलायक पुरावा विज्ञानशास्त्रज्ञांच्या कॉंग्रेसनीं लोकांना दिलेला आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें ' तिसऱ्या महायुद्धांत कोणतीहि बाजू यशस्वी होऊं शकणार नाहीं. कारण यश उपभोगण्यास कोणीहि ह्या भूतलावर शिल्लक रहाणार नाहीं ! ' ह्याकरितां तिसरें महायुद्ध होऊं नये असें वागण्याची जबाबदारी प्रत्येक राष्ट्रावर आहे. आज यूनो हीच एक मोठ्यांतमोठी अशी आंतरराष्ट्रीय संघटना आहे कीं जी हा धोका टाळूं शकेल. आजच्या परिस्थितींत कोणतेंहि राष्ट्र स्वतंत्र व एकाकी असें जीवन जगूं शकत नाहीं. इतकेंच काय परंतु प्रत्येक राष्ट्राचें अस्तित्व आज आंतरराष्ट्रीय घडामोडींवर अवलंबून आहे. म्हणून यूनोमधीलच नव्हे तर यूनोबाहेरील सर्व राष्ट्रांची जबाबदारी ह्याबाबतींत सारखीच ठरते. ही जबाबदारी चांगल्या तऱ्हेनें पार पडण्याच्या दृष्टीनें आंतरराष्ट्रीय संघटना ही खऱ्या अर्थानें जागतिक संघटना बनणें अत्यंत आवश्यक आहे. असल्या परिस्थितींत यूनो हीच संघटना जगाला तारूं शकेल ह्याची खात्री सर्वांना पटलेली आहे.

ज्यावेळीं आपण यूनोच्या सनदेमध्यें बदल घडवून आणण्याचा अगर दुरुस्त्या करण्याचा प्रयत्न करतों, त्यावेळीं यूनोची संघटना जास्तींत जास्त कार्यक्षम कशी होईल हाच दृष्टिकोण पुढें ठेवला पाहिजे. (२) दुसरी एक गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे व ती म्हणजे ज्या दुरुस्त्या व जे बदल सुचवूं ते यूनोच्या १० वर्षांच्या कार्याच्या अभ्यासावरून ठरविले पाहिजेत व ते आजच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितीला योग्य असे पाहिजेत. ध्येयवादाला वास्तवतेच्या दृष्टिकोनांतून बघायला पाहिजे. नुसता ध्येयवाद आंतरराष्ट्रीय संघटनेच्या बाबतींत योग्य नाहीं, असा प्रत्यय आपल्याला इतिहास देत असतांना पुन्हां तशी चूक न होण्याची खबरदारी आपण घेतली पाहिजे. कारण पुनः एक चूक म्हणजे संपूर्ण मानवसमाजाचा निःपात !










## यूनोच्या सनदेचा फेरविचार

यूनोच्या सनदेमध्यें ज्या मुद्द्यांवर फेरविचार व्हावा असें बहुतेक राष्ट्रांना वाटतें त्यांपैकीं ( १ ) आमसभेचे अधिकार, ( २ ) सुरक्षामंडळांतील कायम सभासदांना दिलेला नकाराधिकार ( Veto ), ( ३ ) राष्ट्रांना यूनोमध्यें सभासदत्व देण्याची पद्धति हे महत्त्वाचे मुद्दे होत.

ह्या सर्व प्रश्नांवर राष्ट्राराष्ट्रांचीं निरनिराळीं मतें आहेत. ह्या मतांमधून जीं मतें आमसभेमध्यें दोन तृतीयांश सभासदांच्या बहुमतानें मंजूर होतील त्याप्रमाणें यूनोच्या घटनेमध्यें बदल केले जातील. मात्र सुरक्षामंडळाचे कायम सभासद असलेल्या सर्वच राष्ट्रांची ह्या दुरुस्त्यांना संमति मिळालेली असलीच पाहिजे ( कलम १०८ वें ).

### आमसभेचे अधिकार

यूनोच्या कलम १० प्रमाणें सध्यां " या सनदेच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या कोणत्याहि प्रश्नावर अगर कोणत्याहि विषयांवर, किंवा या सनदेनुसार निर्माण करण्यांत आलेल्या मुख्यांगभूत अथवा दुय्यम शाखांच्या कामकाजावर व अधिकारावर आमसभा चर्चा करील व कलम नं. १२ मध्यें सांगितलेले अपवाद वगळून असल्या कोणत्याहि प्रश्नाबाबत किंवा विषयाबाबत यूनोच्या सभासदांकडे, सुरक्षामंडळाकडे किंवा या दोघांकडेहि शिफारसी करील, " असे अधिकार दिलेले आहेत. हें कलम फार असंदिग्ध व मर्यादित स्वरूपाचें आहे. आमसभेचे असे मर्यादित अधिकार ठेवल्यामुळें आमसभा यूनोचें उद्दिष्ट साधण्याच्या दृष्टीनें तितकीशी सफल होऊं शकत नाहीं. म्हणून आमसभेचें अधिकारक्षेत्र स्पष्ट ठरविलें गेलें पाहिजे व वाढविलें गेलें पाहिजे असें कांहीं राष्ट्रांना वाटतें. ह्या १० व्या कलमांत ' या सनदेच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या कोणत्याहि प्रश्नावर अगर कोणत्याहि विषयावर ' ह्या ऐवजीं ' आंतरराष्ट्रीय कोणत्याहि प्रश्नावर अगर विषयांवर ' आमसभेला चर्चा करण्याचा व त्याप्रमाणें शिफारसी करण्याचा अधिकार दिला गेला पाहिजे; अशा प्रकारची दुरुस्ती सुचविली जाते. समजा, अशी जरी दुरुस्ती केली गेली तरी ' आंतरराष्ट्रीय ' प्रश्न कोणता व ' अंतर्गत ' प्रश्न कोणता हें निश्चित ठरविण्याचें मोजमाप कोणतें ? सध्यां ' अंतर्गत ' व ' आंतरराष्ट्रीय ' प्रश्न हे इतके निगडित झालेले आहेत कीं त्यांची सर्व राष्ट्रांना संमत अशी व्याख्या देणें अतिशय कठीण होऊन बसलें आहे. उदा०, अल्जेरियाचा प्रश्न फ्रान्सला ' अंतर्गत प्रश्न ' वाटतो. परंतु अल्जेरियाला व यूनोमधील बहुतांश राष्ट्रांना हा प्रश्न ' आंतरराष्ट्रीय ' वाटतो. अशा परिस्थितींत ह्या प्रश्नावर आमसभेला चर्चा करण्याचा अधिकार पोंहोंचतो किंवा नाहीं हें ठरविणें कठीण झालें आहे. शिवाय फ्रान्स हें राष्ट्र सुरक्षामंडळांतील कायम सभासद असल्यामुळें फ्रान्सच्या आमसभेमधून निर्गमनामुळें हा प्रश्न जास्तच चिघळला. ह्या प्रश्नावर चर्चा करण्याची तहकुबी मान्य केल्यानंतरच फ्रान्स पुनः यूनोमध्यें कार्य करण्यास तयार झालें.

'आंतरराष्ट्रीय प्रश्न' व 'अंतर्गत प्रश्न' ह्यांच्या कांहीं कसोट्या ठरविणें जरी अशा परिस्थितींत अगत्याचें वाटत असलें तरी तें अतिशय दूरापास्त असें कार्य आहे. सभासदराष्ट्रें ह्या कसोट्या ठरविण्यास जर अयशस्वी ठरलीं तर हा अधिकार आंतरराष्ट्रीय न्यायालयाला द्यावा आणि त्याचा निकाल सर्व राष्ट्रांनीं मान्य करावा अशी पण दुरुस्ती कांहीं राष्ट्रें सुचवितात. त्या दुरुस्त्या यूनोमधील राष्ट्रांना मान्य होतीलच असें नाहीं. आज आपण शक्य तों जास्तींत जास्त विश्वास आंतरराष्ट्रीय संघटनेवर ठेवणें आवश्यक आहे. आज यूनोकडे प्रत्येक राष्ट्र थोडयाफार का होईना पण संशयानें बघत आहे. हा संशयी दृष्टिकोन जितक्या लवकर बदलेल तितकें चांगलें. ह्या बाबतींत सभासदराष्ट्रांवर जितकी जबाबदारी तितकीच जबाबदारी ह्या

राष्ट्रांचें आंतरराष्ट्रीय महत्त्व कमी झालेलें दिसून येतें. व जीं राष्ट्रें त्यावेळीं आंतरराष्ट्रीय दृष्ट्या कमी महत्त्वाचीं वाटत होतीं त्यांपैकीं कांहीं राष्ट्रें आज आंतरराष्ट्रीय शांतता टिकविण्याच्या दृष्टीनें महत्त्वाची ठरलीं आहेत. बदलत्या राजकीय परिस्थितीबरोबर घटनेनें पण आपलें पाऊल ठेवून साथ करावी, त्याच दृष्टीनें यूनोच्या सनदेमध्यें कलम नं. १०८ व १०९ समाविष्ट केलेलें आहे. कलम १०९ (३) प्रमाणें ' ही सनद अंमलांत आल्यापासून आमसभे-( General Assembly )ची दहावी वार्षिक सर्वसाधारण परिषद् भरण्याची वेळ येईपर्यंतच्या कालांत एकदांहि जर ( सनदेचा फेरविचार करण्यासाठीं परिषद् ) अशी परिषद भरविली गेली नाहीं तर, अशी परिषद भरविण्याबद्दलची सूचना त्या दहाव्या वार्षिक परिषदेच्या कार्यक्रमपत्रिकेंत पुढें मांडली जाईल आणि आमसभेंतील सभासदांच्या साध्या बहुमतानें व सुरक्षामंडळां-( Security Council ) मधील कोणाहि सात सभासदांच्या मतानें तशी परिषद् भरूं शकेल असें स्पष्ट ठरलेलें आहे. आज यूनो स्थापन होऊन दहा वर्षें पूर्ण झालीं आहेत. त्यामुळें यूनोच्या सनदेचा फेरविचार करण्याचा प्रश्न प्रामुख्यानें सभासदराष्ट्रांपुढें आहे.

यूनोचा फेरविचार करतांना आपण पुढील गोष्टी ध्यानांत ठेवल्या पाहिजेत : ( १ ) जे कांही बदल अगर दुरुस्त्या सनदेमध्यें व्हाव्यात असें आपणांस वाटतें त्या सर्वांचा हेतु यूनोची संघटना जास्त मजबूत व कार्यक्षम कशी होईल हा असावा. नाहींतर फाजील उत्साहामुळें अगर अट्टाहासामुळें यूनोचें अस्तित्वच नष्ट होण्याकडे त्यांचें पर्यवसान होत जाईल. अशा आंतरराष्ट्रीय संघटनेची गरज जी १९४५ सालीं राष्ट्रांना होती त्यापेक्षां आज जास्तच आहे; ही गोष्ट केव्हांहि विसरतां कामा नये. आजच्या परिस्थितींत तिसरें जागतिक महायुद्ध जर पेटलें तर त्यापासून सर्व प्राणिमात्रांस व वनस्पतीस धोका आहे. ह्याचा खात्रीलायक पुरावा विज्ञानशास्त्रज्ञांच्या कॉंग्रेसनीं लोकांना दिलेला आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें ' तिसऱ्या महायुद्धांत कोणतीहि बाजू यशस्वी होऊं शकणार नाहीं. कारण यश उपभोगण्यास कोणीहि ह्या भूतलावर शिल्लक रहाणार नाहीं ! ' ह्याकरितां तिसरें महायुद्ध होऊं नये असें वागण्याची जबाबदारी प्रत्येक राष्ट्रावर आहे. आज यूनो हीच एक मोठ्यांतमोठी अशी आंतरराष्ट्रीय संघटना आहे कीं जी हा धोका टाळूं शकेल. आजच्या परिस्थितींत कोणतेंहि राष्ट्र स्वतंत्र व एकाकी असें जीवन जगूं शकत नाहीं. इतकेंच काय परंतु प्रत्येक राष्ट्राचें अस्तित्व आज आंतरराष्ट्रीय घडामोडींवर अवलंबून आहे. म्हणून यूनोमधीलच नव्हे तर यूनोबाहेरील सर्व राष्ट्रांची जबाबदारी ह्याबाबतींत सारखीच ठरते. ही जबाबदारी चांगल्या तऱ्हेनें पार पडण्याच्या दृष्टीनें आंतरराष्ट्रीय संघटना ही खऱ्या अर्थानें जागतिक संघटना बनणें अत्यंत आवश्यक आहे. असल्या परिस्थितींत यूनो हीच संघटना जगाला तारूं शकेल ह्याची खात्री सर्वांना पटलेली आहे.

ज्यावेळीं आपण यूनोच्या सनदेमध्यें बदल घडवून आणण्याचा अगर दुरुस्त्या करण्याचा प्रयत्न करतों, त्यावेळीं यूनोची संघटना जास्तींत जास्त कार्यक्षम कशी होईल हाच दृष्टिकोण पुढें ठेवला पाहिजे. (२) दुसरी एक गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे व ती म्हणजे ज्या दुरुस्त्या व जे बदल सुचवूं ते यूनोच्या १० वर्षांच्या कार्याच्या अभ्यासावरून ठरविले पाहिजेत व ते आजच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितीला योग्य असे पाहिजेत. ध्येयवादाला वास्तवतेच्या दृष्टिकोनांतून बघायला पाहिजे. नुसता ध्येयवाद आंतरराष्ट्रीय संघटनेच्या बाबतींत योग्य नाहीं, असा प्रत्यय आपल्याला इतिहास देत असतांना पुन्हां तशी चूक न होण्याची खबरदारी आपण घेतली पाहिजे. कारण पुनः एक चूक म्हणचे संपूर्ण मानवसमाजाचा निःपात !








## यूनोच्या सनदेचा फेरविचार

यूनोच्या सनदेमध्यें ज्या मुद्द्यांवर फेरविचार व्हावा असें बहुतेक राष्ट्रांना वाटतें त्यांपैकीं ( १ ) आमसभेचे अधिकार, ( २ ) सुरक्षामंडळांतील कायम सभासदांना दिलेला नकाराधिकार ( Veto ), ( ३ ) राष्ट्रांना यूनोमध्यें सभासदत्व देण्याची पद्धति हे महत्त्वाचे मुद्दे होत.

ह्या सर्व प्रश्नांवर राष्ट्राराष्ट्रांचीं निरनिराळीं मतें आहेत. ह्या मतांमधून जीं मतें आमसभेमध्यें दोन तृतीयांश सभासदांच्या बहुमतानें मंजूर होतील त्याप्रमाणें यूनोच्या घटनेमध्यें बदल केले जातील. मात्र सुरक्षामंडळाचे कायम सभासद असलेल्या सर्वच राष्ट्रांची ह्या दुरुस्त्यांना संमति मिळालेली असलीच पाहिजे ( कलम १०८ वें ).

### आमसभेचे अधिकार

यूनोच्या कलम १० प्रमाणें सध्यां " या सनदेच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या कोणत्याहि प्रश्नावर अगर कोणत्याहि विषयांवर, किंवा या सनदेनुसार निर्माण करण्यांत आलेल्या मुख्यांगभूत अथवा दुय्यम शाखांच्या कामकाजावर व अधिकारावर आमसभा चर्चा करील व कलम नं. १२ मध्यें सांगितलेले अपवाद वगळून असल्या कोणत्याहि प्रश्नाबाबत किंवा विषयाबाबत यूनोच्या सभासदांकडे, सुरक्षामंडळाकडे किंवा या दोघांकडेहि शिफारसी करील, " असे अधिकार दिलेले आहेत. हें कलम फार असंदिग्ध व मर्यादित स्वरूपाचें आहे. आमसभेचे असे मर्यादित अधिकार ठेवल्यामुळें आमसभा यूनोचें उद्दिष्ट साधण्याच्या दृष्टीनें तितकीशी सफल होऊं शकत नाहीं. म्हणून आमसभेचें अधिकारक्षेत्र स्पष्ट ठरविलें गेलें पाहिजे व वाढविलें गेलें पाहिजे असें कांहीं राष्ट्रांना वाटतें. ह्या १० व्या कलमांत ' या सनदेच्या कार्यक्षेत्रांत येणाऱ्या कोणत्याहि प्रश्नावर अगर कोणत्याहि विषयावर ' ह्या ऐवजीं ' आंतरराष्ट्रीय कोणत्याहि प्रश्नावर अगर विषयांवर ' आमसभेला चर्चा करण्याचा व त्याप्रमाणें शिफारसी करण्याचा अधिकार दिला गेला पाहिजे; अशा प्रकारची दुरुस्ती सुचविली जाते. समजा, अशी जरी दुरुस्ती केली गेली तरी ' आंतरराष्ट्रीय ' प्रश्न कोणता व ' अंतर्गत ' प्रश्न कोणता हें निश्चित ठरविण्याचें मोजमाप कोणतें ? सध्यां ' अंतर्गत ' व ' आंतरराष्ट्रीय ' प्रश्न हे इतके निगडित झालेले आहेत कीं त्यांची सर्व राष्ट्रांना संमत अशी व्याख्या देणें अतिशय कठीण होऊन बसलें आहे. उदा०, अल्जेरियाचा प्रश्न फ्रान्सला ' अंतर्गत प्रश्न ' वाटतो. परंतु अल्जेरियाला व यूनोमधील बहुतांश राष्ट्रांना हा प्रश्न ' आंतरराष्ट्रीय ' वाटतो. अशा परिस्थितींत ह्या प्रश्नावर आमसभेला चर्चा करण्याचा अधिकार पोंहोंचतो किंवा नाहीं हें ठरविणें कठीण झालें आहे. शिवाय फ्रान्स हें राष्ट्र सुरक्षामंडळांतील कायम सभासद असल्यामुळें फ्रान्सच्या आमसभेमधून निर्गमनामुळें हा प्रश्न जास्तच चिघळला. ह्या प्रश्नावर चर्चा करण्याची तहकुबी मान्य केल्यानंतरच फ्रान्स पुनः यूनोमध्यें कार्य करण्यास तयार झालें.

'आंतरराष्ट्रीय प्रश्न' व 'अंतर्गत प्रश्न' ह्यांच्या कांहीं कसोट्या ठरविणें जरी अशा परिस्थितींत अगत्याचें वाटत असलें तरी तें अतिशय दुरापास्त असें कार्य आहे. सभासदराष्ट्रें ह्या कसोट्या ठरविण्यास जर अयशस्वी ठरलीं तर हा अधिकार आंतरराष्ट्रीय न्यायालयाला द्यावा आणि त्याचा निकाल सर्व राष्ट्रांनीं मान्य करावा अशी पण दुरुस्ती कांहीं राष्ट्रें सुचवितात. त्या दुरुस्त्या यूनोमधील राष्ट्रांना मान्य होतीलच असें नाहीं. आज आपण शक्य तों जास्तींत जास्त विश्वास आंतरराष्ट्रीय संघटनेवर ठेवणें आवश्यक आहे. आज यूनोकडे प्रत्येक राष्ट्र थोड्याफार का होईना पण संशयानें बघत आहे. हा संशयी दृष्टिकोन जितक्या लवकर बदलेल तितकें चांगलें. ह्या बाबतींत सभासदराष्ट्रांवर जितकी जबाबदारी तितकीच जबाबदारी ह्या

संघटनेवर पण आहे. ही संघटना जितक्या प्रमाणांत निरपेक्ष व पक्षपातविरहित बुद्धीनें कार्य करील तेवढ्या प्रमाणांत सभासदराष्ट्रांचा तिच्यावरील विश्वास वाढेल. ह्या संघटनेमध्यें जीं कांहीं राष्ट्रें महत्त्वाची भूमिका करतात (उदा० सुरक्षा मंडळांतील कायम सभासद राष्ट्रें) त्यांच्यावर ह्या संघटनेचें बऱ्याचशा अंशीं भवितव्य अवलंबून आहे. ह्या राष्ट्रांनीं पुढाकार घेऊन जर हें संशयानें दूषित झालेलें वातावरण नष्ट करण्याचा प्रयत्न केला तर तें अतिशय परिणामकारक होईल. दुर्दैवानें आज यूनोमधील राष्ट्रें दोन निरनिराळ्या गटांमध्यें विभागलेलीं दिसून येतात. एका गटाचें नेतृत्व अमेरिकेनें स्वीकारलें आहे तर दुसऱ्याचें रशियानें. प्रत्येक गट दुसऱ्या गटाकडे संशयानें, तुच्छतेनें व मत्सरानें बघत असल्याचें आढळून येतें. भारतासारखीं कांहीं राष्ट्रें कोणत्याहि गटांत सामील न होता तें संशयाचें वातावरण प्रामाणिकपणानें दूर करण्याचा प्रयत्न करीत असतांना त्यांच्यावर स्वार्थीपणाचा आरोप कांहीं राष्ट्रांकडून केला गेलेला दिसून येतो. दुसऱ्यावर दोषारोप करण्याची सहजप्रवृत्ति सर्व साधारण माणसांतच नसून मोठमोठीं राष्ट्रें पण त्यानें कशीं पछाडलेलीं आहेत हें ह्यामध्यें स्पष्ट दिसून येतें. एकमेकांचे दोष नुसते दाखवीत बसण्यामध्यें कोणाचाहि फायदा नाहीं. ते दोष काढून टाकण्याचा प्रयत्न सर्वांनी केला पाहिजे.

आमसभेचें अधिकारक्षेत्र वाढविण्याच्या मार्गांत महत्त्वाची अशी एक अडचण आढळून येते ती म्हणजे आमसभेच्या अधिकारवाढीमुळें राष्ट्रांचें सार्वभौमत्व नष्ट होईल अशी त्यांना वाटत असलेली भीति. एका संस्थेच्या अधिकारांत वाढ करावयाची म्हणजे दुसऱ्या संस्थेच्या अधिकारांत घट व्हावयासच पाहिजे हा दृष्टिकोन ह्या भीतीच्या मुळाशीं आहे. जागतिक परिस्थिति आज इतकी बदललेली आहे कीं तिच्यामध्यें राष्ट्र आपले हक्क व अधिकार यूनोचे अगर तसल्या एकाद्या आंतरराष्ट्रीय संघटनेचें सभासद राहून चांगल्या तऱ्हेनें उपभोगूं शकेल. उलट कोणतेंहि राष्ट्र आंतरराष्ट्रीय असुरक्षिततेच्या वातावरणांत आपले हक्क उपभोगूं शकणार नाहीं. आमसभेला जास्त अधिकार देऊन तिला कार्यक्षम बनविण्यामध्यें सभासदराष्ट्र आपला विकास चांगल्या-प्रकारें करून घेऊं शकेल. आजचा प्रश्न 'राष्ट्र-विरुद्ध-यूनो' असा नसून 'यूनोमध्यें राष्ट्र असा आहे.

## सुरक्षामंडळांतील कायम सभासदांना नकाराधिकार

यूनोच्या सनदेमधील कलम २७ ( २ व ३ ) प्रमाणें "सुरक्षामंडळाचें कामकाज कशा रीतीनें चालावें या संबंधाच्या प्रश्नाचे निर्णय त्या मंडळांतील ७ सभासदांचीं मतें जशीं पडतील तसे ठरतील. इतर प्रश्नांबद्दलचे निर्णय सुरक्षामंडळांतील पांचहि कायम ( कोमिनटांग चीन, फ्रान्स, सोव्हिएट रशिया, ब्रिटन व अमेरिका ) सभासदांसकट एकूण सात सभासदांची मतें जशीं पडतील त्याप्रमाणें ठरतील." ह्यावरून दोन गोष्टी स्पष्ट दिसून येतात. पहिली गोष्ट म्हणजे सुरक्षामंडळाचें कामकाज कशा रीतीनें चालावें ह्या बाबतींत फक्त सुरक्षामंडळांतील सभासद आपला नकाराधिकार वापरणार नाहींत. दुसरी गोष्ट म्हणजे इतर सर्व बाबतींत त्यांना आपला नकाराधिकार वापरतां येईल.

सुरक्षामंडळाच्या बाबतींत दोन महत्त्वाच्या मुद्द्यांवर फेरविचार व्हावा असें वाटतें. व ते म्हणजे ( १ ) पांच कायम सभासदांच्या एकमतानें निर्णय घेण्याची पद्धति, ( २ ) कायम सभासदांना दिलेला नकाराधिकार हे होत. ह्या राष्ट्रांना जे इतर सभासद-राष्ट्रांपेक्षां जादा अधिकार देण्यांत आलेले आहेत तीं राष्ट्रें आज खरोखरच 'बडीं राष्ट्रें' आहेत किंवा नाहींत हा प्रश्न आहे. ह्या राष्ट्रांना ज्यावेळीं हे जादा अधिकार देण्यांत आले त्यावेळीं जागतिक








शांतता ह्या राष्ट्रांच्या सहकार्याशिवाय टिकविणें शक्य नाहीं असें वाटत होतें. ज्या 'चीन'ला सुरक्षामंडळामध्यें कायम सभासदत्व देण्यांत आलेलें आहे तें राष्ट्र आज आंतरराष्ट्रीय दृष्टया एक लहानसें व निर्बल असें राष्ट्र आहे. त्याविरुद्ध कम्युनिस्ट चीनला ज्या यूनोच्या संघटनेंत जागा नाहीं तें राष्ट्र मात्र प्रगतिपथावर व प्रबल राष्ट्र बनत असलेलें आढळून येतें. आजचीं 'बडीं राष्ट्रें' हीं कायमचींच 'बडीं राष्ट्रें' राहतील असें नाहीं. दहा वर्षांच्या काळांत दुसरीं राष्ट्रें जागतिक शांतता टिकविण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. त्यांना सुरक्षामंडळाचें जर सभासदत्व दिलें तर जागतिक शांततेचा प्रश्न सोडविणें सुकर होईल. ह्याच दृष्टिकोनांतून ऑस्ट्रेलियानें भारताला सुरक्षामंडळावर कायम सभासदत्व द्यावें असें सुचविलें होतें.

मोठमोठ्या राष्ट्रांबरोबर सुरक्षामंडळांत लहान लहान राष्ट्रांना प्रतिनिधी पाठवितां यावेत म्हणून सहा राष्ट्रांची दोन वर्षांकरितां आमसभा निवड करीत असते. परंतु ह्या जागांवर दहा वर्षांत कोणतीं राष्ट्रें आलीं ह्याचा जर अभ्यास केला तर असें दिसून येतें कीं सहा जागांपैकीं दोन जागा नेहमी दक्षिण अमेरिकन राष्ट्रांनीं भरल्या जातात; एक पूर्व राष्ट्रगट, एक पश्चिम राष्ट्रगट, एक कॉमनवेल्थ व एक मध्यपूर्वेतील राष्ट्रगट ह्यांनी सुचविलेल्या राष्ट्रानें भरल्या जातात. वस्तुत: आशिया व आफ्रिका खंडांतील राष्ट्रांना केव्हांहि सुरक्षामंडळांचा सभासद बनण्याची संधि मिळाली नाहीं. यूनोसारखी आंतरराष्ट्रीय संघटना जर कांहीं गटांवर आपली कृपादृष्टि ठेवूं लागली तर अर्थातच दुसऱ्या राष्ट्रांची श्रद्धा व विश्वास ह्या संघटनेवरून उडून जाण्याचा संभव आहे. ही गोष्ट ध्यानांत घेवून कांहीं राष्ट्रें अशी दुरुस्ती सुचवितात कीं सुरक्षामंडळाचे सभासद हे सर्व भागांतून निवडून येतील अशी योजना आंखण्यांत यावी.

सुरक्षामंडळांतील कायम सभासदांना जो नकाराधिकार देण्यांत आला आहे त्यामुळें आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्यास बरेच अडथळे आतांपर्यंत निर्माण झाले आहेत. रशियानें ह्या दहा वर्षांच्या काळांत नकाराधिकाराचा उपयोग जवळ जवळ ६० वेळां केलेला आढळून येतो. परंतु हा नकाराधिकार काढून घेतल्यानें सर्व कांहीं व्यवस्थित होईल असें समजणें चुकीचें आहे. सुरक्षामंडळाचें व पर्यायानें यूनोचें अस्तित्व ह्या नकाराधिकारावर आजहि अवलंबून आहे. कोणतेंहि राष्ट्र आजच्या परिस्थितींत आपला हा अधिकार रद्द करूं देणार नाहीं. म्हणून हा प्रश्न बाजूला ठेवून नकाराधिकार केव्हां वापरावा व केव्हां वापरू नये ह्या गोष्टीचा जर फेरविचार झाला तर तें जास्त चांगलें. जपानसारख्या राष्ट्राचे ह्या बाबतींत असें म्हणणें आहे की शांततामय मार्गानें जर आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्यांत येत असतील तर त्यावेळीं हा नकाराधिकार वापरूं नये. बऱ्याचशा राष्ट्रांचें असें म्हणणें आहे कीं नवीन राष्ट्रांना सभासदत्व देण्याच्या प्रश्नावर सुद्धां नकाराधिकार वापरूं नये. ज्या राष्ट्रांना हा अधिकार देण्यांत आला आहे त्या राष्ट्रांनीं तो वारंवार उपयोगांत आणून आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्याच्या कामांत अडथळे निर्माण न करतां, तो वापरण्याशिवाय गत्यंतरच नाहीं अशी परिस्थिति निर्माण झाली आहे अशी त्या राष्ट्राची खात्री झाल्याशिवाय त्यानें तो वापरूं नये. नकाराधिकाराचा उपयोग औषधासारखा योग्य वेळींच केला पाहिजे. अर्थात् योग्य वेळ कोणती व अयोग्य वेळ कोणती हें मात्र त्या राष्ट्रांनीं आपल्या सदसद्विवेक बुद्धीनें व जागतिक कल्याणाचें ध्येय डोळ्यापुढें ठेवून ठरवावयाचें आहे. ह्या प्रश्नाला घटनेचें स्वरूप देणें आज तरी अशक्य आहे; आणि जवळच्या भविष्यांत तें शक्य होईल असें वाटत नाहीं.








## सभासदत्वाचा प्रश्न

यूनोची संघटना ही खऱ्या अर्थानें जागतिक संघटना होण्याच्या दृष्टीनें तिच्यामध्यें शक्यतों जगांतील सर्व राष्ट्रांना सभासदत्व दिलें पाहिजे. परंतु सनदेंतील कलम ४ थें ( १ व २ ) ह्या प्रमाणें "या सनदेमध्यें समाविष्ट असलेल्या जबाबदाऱ्यांचा जीं ( राष्ट्रें ) स्वीकार करतील आणि तसें करण्यास तीं खरोखरच उत्सुक व समर्थ आहेत असें ह्या संघटनेचें मत पडेल त्या सर्व शांतताप्रेमी राष्ट्रांना तिचे सभासद होता येईल. तसेंच सुरक्षामंडळानें शिफारस केल्यानंतर आमसभेनें तसाच निर्णय दिला कीं, अशा कोणत्याहि राष्ट्राला यूनोचें सभासदत्व प्राप्त होईल." असें कलम यूनोच्या सनदेमध्यें समाविष्ट केलेलें असलें तरी जवळ जवळ एक तृतीयांश राष्ट्रें आज तिच्यामध्यें नाहींत. ह्याच्या कारणमीमांसेविषयीं जर विचार केला तर आपल्याला असें आढळून येतें कीं या कलमांमध्यें बरेचसे शब्द असे आहेत कीं त्यांचा अर्थ स्पष्ट मांडतां येत नाहीं. उदा० 'ती राष्ट्रें ...खरोखरच उत्सुक व समर्थ आहेत.' हें वाक्य पहा. एखादें राष्ट्र हें यूनोच्या जबाबदाऱ्या पार पाडण्यास खरोखरच उत्सुक व समर्थ आहे असें मत बहुतेक राष्ट्रांचें असूं शकेल. परंतु तेंच राष्ट्र तसें समर्थ नाहीं असें सुरक्षामंडळांतील कायम सभासदांपैकीं एका जरी राष्ट्राचें मत पडलें तरी त्या राष्ट्राला सभासदत्व मिळणार नाहीं. त्याप्रमाणें एखादें राष्ट्र 'शांतताप्रेमी' आहे किंवा नाहीं ह्याबाबतपण मतभेद असूं शकतील; कारण 'शांतताप्रेमी', 'समर्थ', 'उत्सुक' या शब्दांची अचूक व्याख्या करणें कठीण आहे. भारताला अगर सोव्हिएट रशियाला कम्युनिस्ट चीन हें राष्ट्र खरोखरच शांतताप्रेमी आहे असें जरी वाटत असलें तरी अमेरिकेला तसें वाटत नाहीं. म्हणून चीनसारख्या एका मोठ्या व ४० कोटी जनता असलेल्या राष्ट्राला यूनोबाहेर रहावें लागतें.

अलीकडे नवीन राष्ट्रांचा सभासदत्वाचा प्रश्न सोडविण्याचा एक नवीनच मार्ग अवलंबिला गेला. तो म्हणजे दोन्ही मोठमोठ्या गटांनी सुचविलेल्या राष्ट्रांचा मिळून एक गट तयार करावयाचा व त्या गटाला एकदम सभासदत्व द्यावयाचें ( Package deal ) हा होय. ह्या गटामध्यें एकूण १८ राष्ट्रांचीं नांवें समाविष्ट केलेलीं होतीं. त्यांमध्यें तेरा राष्ट्रें अमेरिकनगटप्रेरित व बाकीचीं रशियनगटप्रेरित अशीं होती. रशियन गटानें सुचविलेल्या यादीमध्यें आउटरमंगोलियाचें नांव होतें. परंतु चँग-कै-शेकच्या चीननें आऊटरमंगोलियाविरुद्ध नकाराधिकार वापरण्याचें जाहीर केलें; तर त्याविरुद्ध रशिया अमेरिकनगटसंमत जीं सर्व राष्ट्रें होतीं त्याच्याविरुद्ध नकाराधिकार वापरील असें रशियानें जाहीर केलें. ब्रिटन, अमेरिका व फ्रान्स ह्या 'बड्या' राष्ट्रांनीं हा प्रश्न सोडविण्याकरतां अप्रत्यक्ष रीतीनें कांहीं अंशी हातभार लावला तरी एका लहानशा ( Kuomintang China ) राष्ट्राच्या हेकेखोरपणामुळें वरील राष्ट्रांना सभासदत्वास मुकण्याचा प्रसंग आला होता. ह्या सर्व राष्ट्रांना सभासदत्व द्यावें असा कौल आमसभेनें दिला होता. कॅनडा व भारत ह्यांच्या मध्यस्थीनें व रशियानें दाखविलेल्या दूरदर्शीपणामुळें हा प्रश्न बऱ्याच अंशी सुटूं शकला.

सुरक्षामंडळांतील कायमसभासदांना, सभासदत्व देण्याच्या प्रश्नावर नकाराधिकार अशा तऱ्हेनें मर्यादित करण्याचा प्रश्न सहजासहजीं सुटेल असें वाटत नाहीं. ह्या बाबत दुसरी एक सूचना मांडली जाते व ती म्हणजे सभासदत्वाच्या प्रश्नावर आमसभेनें निर्णय घ्यावा. आमसभेमध्यें एक कमेटी स्थापन करून त्या कमेटीच्या शिफारसीनुसार आमसभेनें दोन तृतीयांश बहुमतानें निर्णय घ्यावा. ह्या योजनेस सुरक्षामंडळांतील कायमसभासद राष्ट्रें मान्यता देतीलच असें नाहीं. ह्या राष्ट्रांना आपले अधिकार मर्यादित करण्यापासून जी भीति वाटते ती सर्वच



अनुक्रमणिका






बाबतींत सकारण आहे असें वाटत नाहीं. राजकीय प्रश्नापेक्षां हा प्रश्न मानसशास्त्रीय आहे. संशयाचे, भीतीचें व मत्सराचें जें वातावरण आढळून येतें तें दूर करण्याचे प्रयत्न जर यशस्वी झाले तर यूनो अतिशय कार्यक्षम होईल व आपल्यापुढें ठेवलेलें ध्येय गांठूं शकेल.

यूनोच्या सनदेचा फेरविचार करतांना आज आपल्याला आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं व ती म्हणजे प्रादेशिक मिलिटरी व आर्थिक करार. सनदेच्या ५१ व्या कलमाप्रमाणें "ह्या सनदेमध्यें कांहीहि म्हटलेलें असलें तरी, यूनोचा सभासद असलेल्या एखाद्या राष्ट्रावर जर कोणाकडून सशस्त्र हल्ला झालाच तर शांतता व सुरक्षितता राखण्यासाठीं सुरक्षामंडळाकडून कांहीं उपाययोजना होईपर्यंत, स्वसंरक्षणार्थ व्यक्तिशः किंवा इतरांच्या मदतीनें लढण्याचा त्या राष्ट्राच्या स्वयंभू हक्काला त्यामुळें बाध येणार नाहीं." तसेंच ५२ ( १ ) व्या कलमाप्रमाणें "आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता राखण्यासाठीं कांहीं विशिष्ट भागांतच उपाययोजना करून भागण्यासारखें असल्यास त्यासाठीं प्रादेशिक व्यवस्थापक मंडळें अस्तित्वांत यायला ह्या सनदेंतील कोणत्यादि कलमामुळें बाध येत नाहीं. फक्त ती व्यवस्था व यंत्रणा यांचीं कृत्यें यूनोच्या उद्देशांना अगर तत्त्वांना अनुसरणारीं अशींच असलीं पाहिजेत." ह्या कलमान्वयें सभासद राष्ट्रांना प्रादेशिक मंडळें स्थापन करण्याचा व त्याप्रमाणें त्यांचा शांतता टिकविण्याकरतां अगर स्वसंरक्षणाकरतां उपयोग करण्याचा अधिकार दिलेला आहे. त्याप्रमाणें बरेचसे आंतरराष्ट्रीय करार घडून आलेले आपल्यास दिसतात. उदा० नाटो, सियाटो, बगदाद करार, मेडो इत्यादि. ह्या करारावर सह्या करणाऱ्या राष्ट्रांवर जर कोणाकडून सशस्त्र हल्ला झाला तर त्या राष्ट्राच्या संरक्षणाची जबाबदारी ह्या करारान्वयें त्यांमध्यें सामील असलेल्या सर्व राष्ट्रांची आहे. हे करार करण्याचा मुख्य उद्देश म्हणजे 'सांघिक संरक्षण' ( Collective Security ) हा होय. एका प्रदेशांत ( region ) असणाऱ्या राष्ट्रांना सर्वसाधारण धोका असेल त्यापासून संरक्षण करणें हा ह्या करारामागें हेतु आहे. हे करार यूनोच्या उद्देशांना अगर तत्त्वांना अनुसरणारे आहेत किंवा नाहीं हें ठरविणें फार कठीण आहे. ह्या मिलिटरी करारान्वये जगांतील दोन मोठमोठ्या गटांमधील तेढ मात्र वाढलेली दिसून येते. अशा परिस्थितींत सनदेंत राष्ट्रांना जो हा अधिकार दिलेला आहे तो ह्यापुढें कितपत चालूं ठेवावा हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. सनदेंत दिलेले हे अधिकार सभासदराष्ट्रें रद्द करूं देतील ही अशक्य गोष्ट वाटते.

वरील विवेचनावरून आपणांस असें दिसून येईल कीं यूनोची सनद ही एकमेकांविरुद्ध, अस्पष्ट व असंदिग्ध अशा कलमांचें कडबोळें आहे. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या परिस्थितीचा परिणाम तिच्यावर झालेला आहे. सनदेंत आंतरराष्ट्रीय संघटनेच्या आवश्यकतेबरोबर सभासदराष्ट्रांचें सार्वभौमत्व टिकविण्याचा निष्फळ प्रयत्न केलेला दिसून येतो. यूनोच्या सनदेचा फेरविचार आज आपण तिसरें महायुद्ध पेटलें कीं काय अशा भीतिमय वातावरणांत करीत असलों तरी मागच्या दहा वर्षांतील यूनोच्या कार्याचा तपशील आपल्यापुढें आहे. त्याचा अभ्यास करून सनदेमध्यें योग्य बदल घडवून आणणें व त्या कार्याला सहकार्य देणें प्रत्येक राष्ट्रसभासदाचें कर्तव्य आहे. राष्ट्रांराष्ट्रानें समजूतदारपणानें व सहकार्यानें हें प्रश्न सोडविण्यांतच त्यांचा फायदा आहे. आजचा प्रश्न कोणत्या राष्ट्रानें चांगलें जगावें हा नसून सर्वांनी जगावें किंवा नाहीं हा आहे. एका राष्ट्राचा फायदा हा दुसऱ्या राष्ट्राच्या नुकसानींत नसून, एका राष्ट्राचा फायदा दुसऱ्या राष्ट्राच्या फायद्यांत आहे. 'सहजीवन' Co-existence ) हाच ह्यावर उपाय आहे. हें जर ओळखलें नाहीं तर 'सहमरण' (Co-destruction) हें चुकणार नाहीं.

---








श्री. म. दा. साठे

# महाराष्ट्राची पंडित-परंपरा

## प्रास्ताविक

लेखाला प्रत्यक्ष सुरुवात करण्यापूर्वी कांहीं गोष्टी स्पष्ट व्हावयास पाहिजेत. महाराष्ट्राची म्हणजे कोणत्या भूभागाची ? संयुक्तमहाराष्ट्राची चळवळ सुरू झाल्यापासून 'महाराष्ट्रा'ची ओढाताण सुरू आहे. परंतु वरील शीर्षकांत उल्लेखिलेल्या मर्यादा मी नर्मदेपासून कृष्णेपर्यंत दक्षिणोत्तर व पश्चिमसमुद्रापासून तों पूर्वेस मराठवाड्यापर्यंत घेणार आहे. यांत विदर्भ, खानदेश, मराठवाडा, अपरांत ( कोंकण ), दमण-दीवपासून गोव्यापर्यंत इतका भाग येतो. अर्थात् बेळगांव, कारवार हा भाग आलाच. पूर्वेकडे महाराष्ट्राला स्वाभाविक व भौगोलिक मर्यादा नाहींत. इ. स. पूर्वीपासून अनेक ग्रंथांत महाराष्ट्राचा व महाराष्ट्रीभाषेचा उल्लेख आला आहे. आणि विदर्भ हें नांव जरी आजहि कायम आहे तरी त्याचा अंतर्भाव महाराष्ट्रांतच होतो.[१] राजशेखरानें आपल्या बालरामायणांत विदर्भाचा अंतर्भाव महाराष्ट्रांत केला आहे. 'महाराष्ट्र' हें नांव या भागाला सातवाहनांच्या राज्यविस्तारामुळें मिळालें असा विद्वानांचा तर्क आहे. तेव्हां वरील भूभागांतील पंडितपरंपरा सांगण्याचा उद्देश या लेखांत कर्तव्य आहे.

दुसरी गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती ही कीं 'पंडित' कोणाला म्हणावयाचें ? महाराष्ट्रांत वारकरी ( संत ), धारकरी ( योद्धे ) प्रसिद्ध आहेत व त्यांचा इतिहासहि थोडाबहुत ज्ञात आहे. पण संस्कृत विद्येंत निष्णात असलेल्या व त्या वाङ्मयांत व शास्त्रांत भर घालणाऱ्या पंडितांची माहिती जितकी असावी तितकी नाहीं. या पंडितांत मराठी भाषेंत पांडित्य दाखविणाऱ्यांचा — वामन पंडित, मोरोपंत वगैरेंचा—समावेश नाहीं. संत कवी व पंत कवी महाराष्ट्रांत अनेक झाले पण वेदान्त, न्याय, व्याकरण, साहित्य, मीमांसा, ज्योतिष इत्यादि विषयांत ज्या पंडितांनीं भर घातली त्यांचीच परंपरा येथें देण्याचा उद्देश आहे.

## प्रादेशिक पंडिती परंपरा

ही परंपरा पाहण्यासाठीं ग्रंथ आणि ग्रंथकार यांच्या प्रकाशित व अप्रकाशित उपलब्ध असलेल्या सूची ( कॅटलॉग्ज् ) पाहिल्या, परंतु त्यांत महाराष्ट्रीय नांवें असलेल्या ग्रंथकारांचीं फारच थोडीं नांवें सांपडतात. दाक्षिणात्य नांवें आहेत पण 'दाक्षिणात्य' म्हणजे महाराष्ट्रीय असें समीकरण होत नाहीं. कारण महाराष्ट्र सोडून दक्षिणेकडे तेलंगण, आंध्र, केरळ, कन्नड, चोलमंडळ वगैरे अनेक देश आहेत. 'प्रियतद्धिता हि दाक्षिणात्याः' असा पतंजलीच्या महाभाष्यांत उल्लेख आढळतो. सर्व शास्त्रें व त्यांचे ग्रंथकर्ते यांचें निरीक्षण केल्यास स्थूलमानानें असें म्हणतां येईल कीं कांहीं कांहीं प्रदेश विशिष्ट शाखांसाठीं प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थ, काश्मीरांत ज्योतिष, वंग देशांत न्याय, माळवा व गुजराथ यांत साहित्य, महाराष्ट्र सोडून दक्षिण भागांत वेदान्त, बिहारांत मीमांसा तर पुण्य वाराणशींत सर्व शास्त्रें भरभराटीस आलीं. महाराष्ट्राच्या वांट्याला धर्म व व्याकरण हे विषय आले असें म्हणण्यास हरकत नाहीं.

महाराष्ट्राच्या पंडित-परंपरेचें केंद्र पैठण असून त्याचा इतिहास सामान्यतः इ. स. १५०० पासून

१ डॉ. केतकरकृत प्राचीन महाराष्ट्रविभाग 'महाराष्ट्र-क्षेत्र-निर्णय' पा. ३२ ते ३७.

मिळतो. तत्पूर्वी देवगिरीच्या ऐन वैभवकाळांत ज्ञानेश्वरसमकालीन बरेच पट्टीचे विद्वान् असले पाहिजेत. परंतु त्यांचीं नांवें उपलब्ध नाहींत. शिवाजीच्या राज्याभिषेकाचे वेळीं गागाभट्टाचें नांव ऐकूं येतें आणि त्याला काशीहून मुद्दाम आणविलें होतें असें इतिहास सांगतो. शिवाजीचें मौंजीबंधन न झाल्यानें तो संस्कारहीन आहे या सबबीवर दक्षिणेतील शास्त्री, पंडित व वैदिक त्यावर राज्याभिषेक करण्यास तयार नव्हते. यादवांचे कालीं 'हेमाद्रि' हा महापंडित होता त्याचा 'चतुर्वर्ग-चिंतामणि' हा ग्रंथ व्रतवैकल्यांबद्दल प्रसिद्ध आहे. हे गागाभट्ट रामकृष्णभट्टांचे प्रशिष्य होते. रामकृष्ण भट्टांचा काल इ. स. १५०० ते १५५० हा येतो.

रामकृष्ण भट्ट — १५०० ते १५५०
|
नारायण भट्ट — १५३० ते १६००
|
ब्रह्मेंद्रसरस्वती — गागाभट्ट (शिवकालीन)
शंकरभट्ट (१५८०–१६५०) — भट्टोजी दीक्षित १५८०–१६५०

**भट्टोजी दीक्षित:–** आज अखिल भारतांत पाणिनीय व्याकरण चालू आहे. भट्टोजी दीक्षित हे अर्वाचीन काळांतले व्याकरणशास्त्राचे प्रमुख प्रवर्तक होत. या शास्त्रावरील त्यांचा **सिद्धान्त कौमुदी** हा ग्रंथ प्रमाणभूत मानला जातो. भट्टोजी दीक्षित हे देशस्थ ब्राह्मण होते असें म्हणतात; परंतु डॉ. पी. के. गोडे हे आपल्या 'भट्टोजी दीक्षित' या निबंधांत ते तेलगू होते असें म्हणतात. पैठण हें जरी एके-काळीं दक्षिणेंतील संस्कृत विद्येचें पीठ होतें तरी त्याला काशीपीठाची बरोबरी कधींच करतां आली नाहीं. गागाभट्ट काय किंवा भट्टोजी दीक्षित काय, हे मुळचे जरी महाराष्ट्रीय असले तरी त्यांचें अध्ययन काशीस झालें, आणि ही प्रथा अगदीं अलीकडे पेशवाईत रामशास्त्री प्रभुण्यांपर्यंत होती. इतकेंच नव्हे तर पेशवाईनंतर विश्रामबागवाडा पाठशाळा बंद झाल्यावरहि ती कांहीं दिवस चालू होती.

### भट्टोजी दीक्षितांची शिष्यपरंपरा

भट्टोजी दीक्षित यांचे नातू हरि दीक्षित व त्यांचे शिष्य तासगांवचे नागोजीभट्ट काळे हे सर्व महाराष्ट्रीय असून यांनीं काशीस अध्ययन केलें. पेशव्यांनीं नीळकंठशास्त्री थत्ते यांना काशीस पाठवून पुण्याच्या दरबारी आणविले व त्यांच्याकडून मग महाराष्ट्रांतच अखंड विद्वद्परंपरा सुरू झाली.

भट्टोजी दीक्षितें—हरि दीक्षित—नागेशभट्ट—पायगुंडे.

वैद्यनाथ पायगुंडे
|
नीळकंठशास्त्री थत्ते
|
१ राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर (सातारा), २ मेरुशास्त्री गोडबोले, ३ मोरशास्त्री साठे (पुणें), ४ नीळकंठशास्त्री भट (पुणें), ५ भास्करशास्त्री अभ्यंकर (सातारा), ६ गोविंदाचार्य अष्टपुत्रे (वाई), ७ कुप्पाशास्त्री द्रविड (पुणें), ८ दिनकरशास्त्री खांबेटे, ९ राघवाचार्य ओक, १० गोपाळाचार्य कऱ्हाडकर.

यांतील बहुतेकांनीं आपली शिष्य–परंपरा तयार करून महाराष्ट्रांत व्याकरणविद्या बद्धमूल केली. साताऱ्यास गजेंद्रगडकर आणि अभ्यंकर, पुण्यास भट आणि साठे, नागपुरास घाटे आणि धुले, वाईस अष्टपुत्रे, आगाशे, वळे, रड्डी, भारद्वाज, पंढरपुरास धारुरकर, नाशकास वारे इत्यादि शिष्य आणि प्रशिष्य पाठशाळा चालवूं लागले; व अनेक पट्टीचे वैयाकरण तयार झाले. इंदूर, ग्वाल्हेर, सांगली,

२ प्रो. का. वा. अभ्यंकरकृत– व्याकरणमहाभाष्य, प्रस्तावनाखंड, पान १००.








मिरज, धार, कोल्हापूर या मराठे वा ब्राह्मण संस्थानिकांच्या आश्रयानें अनेक पंडित राहूं लागले व त्यांनीं पाठशाळा स्थापन केल्या. नागपुरास भोंसल्यांनीं सदाशिवभट्ट घुले यांस काशीहून बोलावून घेतलें.

पुण्यांतील एकट्या भट घराण्यांत विष्णुशास्त्री, धोंडशास्त्री, हरिशास्त्री, बाळशास्त्री हे अनुक्रमें धार, ग्वाल्हेर, इंदूर येथें पाठशाळाप्रमुख होते. भास्करशास्त्री अभ्यंकरांचे शिष्य रामशास्त्री गोडबोले यांनीं गुरूंचे पौत्र वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांना तयार करून गुरुऋण फेडलें व गुरूला दिलेल्या वचनांतून मुक्त झाले. ' विनाश्रया न शोभन्ते पण्डिता वनिता लताः ' हें सुभाषित निदान पंडितांच्या बाबतींत तरी अक्षरशः खरें ठरलें. पूर्वीं पेशव्यांनीं जेव्हां पंडितांना श्रावणमासांत पर्वतीच्या रमण्यांत ओघराळयानें दक्षणा वाटण्यास सुरुवात केली तेव्हां काशीपासून रामेश्वरापर्यंत देशोदेशींचे ब्राह्मण पुण्यास त्यानिमित्तानें जमूं लागले व पुण्यास विद्वानांची खरी परीक्षा होते असा लौकिक अखिल हिंदुस्थानांत झाला. एके वर्षीं श्रावणमासांत अडतीस लाख रुपये वाटण्यांत आले असा पेशवे दप्तरांतील कागदोपत्रीं उल्लेख आहे.

### विश्रामबागवाडा पाठशाळा

पेशव्यांचें राज्य इंग्रजांनीं खालसा केल्यावर हा राजाश्रय तुटला, परंतु एल्फिन्स्टन मुंबईचा गव्हर्नर असतांना त्यानें पुण्यास विश्रामबागवाड्यांत एका इंग्रज अधिकाऱ्याच्या देखरेखीखालीं संस्कृत पाठशाळा स्थापन केली व श्रावणमासांतील दक्षिणेपैकीं कांहीं भागाचा विनियोग या कामीं करण्याचें ठरविलें. अनेक शास्त्रांसाठीं त्या त्या शास्त्रांत तज्ज्ञ पंडितांची नेमणूक करून त्यांच्या हाताखालीं दुय्यम शास्त्री नेमले; व विद्वत्तेप्रमाणें वेतनश्रेणीहि ठरवून दिली. मोरशास्त्री साठे, नीळकंठशास्त्री भट वगैरे शास्त्री शास्त्रांचे प्रमुख म्हणून काम करीत होते. जुन्या परंपरेप्रमाणें विद्वान् तयार होऊं लागले. मुख्य साहेब फक्त देखरेख करीत असे. धार्मिक समजुतींत ढवळाढवळ झाली नाहीं. हीं शास्त्रें शिकण्याचा अधिकार असलेल्यांनाच पढविलें जाई. डॉ. कीलहॉर्न यांनीं एल्फिन्स्टन कॉलेजांत अनेक वर्षें संस्कृताध्यापनाचें काम केलें. यांनीं लिहिलेलें संस्कृत भाषेचें व्याकरण प्रसिद्ध आहे. या आंग्लपंडिताला व्याकरणग्रंथांचें पांक्त अध्ययन मुळांतून प्रसिद्ध वैयाकरणापासून करावयाचें होतें. पण या अनधिकाऱ्याला त्या वेळचा कोणीहि पंडित शिकविण्यास तयार होईना. तेव्हां मोठ्या मिनतवारीनें भास्करशास्त्री अभ्यंकर यांनीं आपले शिष्य अनंतशास्त्री पेंढारकर यांस परवानगी दिली. पण त्यांनींहि अनेक अटी घातल्या. कीलहॉर्ननें प्रातःकालीं स्नानविधी आटोपून गुरूपासून थोड्या अंतरावर दर्भासनावर बसावयाचें. सर्व अध्यापन संस्कृत माध्यमांतून व्हावयाचें ठरलें. डॉ. कीलहॉर्न याला खरी तळमळ असल्यानें त्यानें हें सर्व कबूल केलें ! पाठ सुरू झाले. पुढें परिभाषेन्दुशेखरांतील ' अन्तरंग ' परिभाषा ही समजण्यास फार कठीण. पेंढारकरशास्त्र्यांच्यानें कीलहॉर्नचें समाधान होईना तेव्हां त्यानें साताऱ्यास भास्करशास्त्री अभ्यंकरांकडे धांव ठोकली व सर्व अटी कबूल करून जिज्ञासा पूर्ण करून घेतली !

### परंपरेचा ऱ्हास

पण पुढें या विद्येच्या ऱ्हासाला कारणीभूत अशा कांहीं गोष्टी घडल्या. सन १८३४ मध्यें मेकॉलेच्या मताप्रमाणें इंग्रजी शिक्षण देण्यास सुरुवात झाली. इंग्रजांना राज्यव्यवस्थेसाठीं इंग्रजी जाणणारे लोक पाहिजे होते. पंडितकुलोत्पन्न असूनहि नव्या विलोभनानें जुनी परंपरा सोडून इंग्रजीचें शिक्षण लोक घेऊं लागले. कारण फुकट शिक्षण, मोठाल्या शिष्यवृत्त्या, व थोड्या शिक्षणानें लठ्ठ पगाराच्या व सत्तेच्या जागा मिळूं लागल्या. सरकारनेंहि पाठशाळांवरचा खर्च कमी करून तो












पैसा इंग्रजीशिक्षणाकडे घातला. हळुहळू विश्रामबाग-वाड्यांतील संस्कृत पाठशाळा बंद होऊन त्याच पेशव्यांच्या ऐतिहासिक वाड्यांत इंग्रजी शाळा सुरू झाली. पुढें डेक्कन कॉलेज, दक्षिणा फेलो, डेक्कन-व्हर्नाक्युलर सोसायटी या संस्थांवर श्रावणमास दक्षिणा खर्च होऊं लागली. इतकें होऊनहि ज्यांच्या अंगांत परंपरागत विद्यांचा व शास्त्रांचा अभिमान होता ते काशीस अध्ययनासाठीं जाऊं लागले. विश्रामबाग वाड्यांतील पाठशाला कशीबशी सन १८५० पावेतों जीव धरून होती.

काशींत मात्र सर्व शास्त्रांच्या पाठशाला चालू होत्या. कारण तेथील पंडितांना देशोदेशींचे संस्थानिक धर्मभावनेनें मदत करीत असत. काशीविश्वेराच्या दर्शनाइतकेंच विद्वानांची संभावना करणें हें पुण्य समजलें जाई व अजूनहि समजलें जातें. थोड्याच दिवसांपूर्वी राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं विद्वानांचा यथाविधि सत्कार ( पादधावन वगैरेनें ) करून त्यांना महादक्षिणा दिली. कै. पंडित मालवीयांनीं काशीविद्यापीठासाठीं ( Banaras Hindu University ) कोट्यवधि रुपये जमा केले, त्यांतील रहस्यहि हेंच होय.

काशीस महाराष्ट्रीय पंडितांची परंपरा सुरू झाली. काशिनाथशास्त्री अष्टपुत्रे त्यांचे शिष्य राजाराम शास्त्री कार्लेकर व त्यांचे शिष्य बाळशास्त्री रानडे ( बाल सरस्वती ) यांनीं काशीस अध्ययन केलें. बाळशास्त्र्यांनीं अनेक नामांकित शिष्य तयार केले. त्यांत शिवकुमारशास्त्री, लक्ष्मणशास्त्री व त्यांचे चिरंजीव राजेश्वरशास्त्री द्रविड, गंगाधरशास्त्री तेलंग, गंगानाथ झा, हेमराज पंडित ( नेपाळ ), दामोदरशास्त्री भारद्वाज, केशवशास्त्री मराठे, गुरुप्रसादशास्त्री वगैरे प्रसिद्ध होत.

## पुण्यांतील नवी पाठशाळा

इकडे पुण्यास राजाश्रयाच्या अभावीं संस्कृत पाठशाळा बंद पडली हें वर सांगितलेंच आहे व पंडितपरंपरा खंडित झाली. याची जाणीव आधुनिक विद्वानांनाहि ज्ञाणवूं लागली. त्याचा परिणाम असा झाला कीं, सन १८८५ मध्यें ( शके १८०६ माघ महिन्यांत वसंतपंचमीस ) न्या. मू. माधवराव रानडे, डॉ. भांडारकर, प्रो. काथवटे यांनीं दामोदरशास्त्री साठे ( लेखकाचे जनक ), नरसिंहशास्त्री शेजवलकर वगैरेंच्या साहाय्यानें पुण्यास संस्कृत पाठशाळा स्थापन केली. सर वुइल्यम वेडरबर्नसारख्या परकीय विद्वानांनींहि सहानुभूति दाखविली. या पाठशाळेवर प्रथम नारायणशास्त्री गोडबोले यांची नेमणूक झाली. परंतु या पाठशाळेची खरी सेवा कै. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं सन १८९० ते १९४२ पर्यंत जवळजवळ अर्ध शतक केली. या कालावधींत शास्त्रीबोवांनीं शिष्यपरंपरा तयार केली म्हणून महाराष्ट्रांत ही विद्या जीव धरून तरी आहे. त्यांपैकीं विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, म. म. प्रो. का. वा. अभ्यंकर (कै. शास्त्रीबोवांचे सुपुत्र), भगवानशास्त्री धारुरकर, कै. रंगाचार्य रड्डी, शंकरशास्त्री मारुळकर (सध्यां त्याच पाठशाळेचे प्रमुख) इत्यादि प्रमुख होत. प्रस्तुत लेखकालाहि त्यांच्या पायाशीं अध्ययन करण्याचें भाग्य लाभलें होतें.

## महाराष्ट्रीय पंडितांनीं संस्कृत विद्येंत घातलेली भर

मागें सांगितलेंच आहे कीं महाराष्ट्रीय पंडितांनीं मुख्यतः व्याकरणशास्त्रांत भरीव कामगिरी केली. इतर विषयांत केली नाहीं असें नाहीं पण ती डोळयांत भरण्याइतकी नाहीं. नाहीं म्हणावयास महाभारतावरील प्रसिद्ध टीकाकार नीलकंठ चतुर्भुज हा नगरजिल्ह्यांतील होता. त्याची सातवी पिढी आज ‘ चौधरी ’ या उपनांवानें पुण्यास आहे. ग्रंथ आणि ग्रंथकार खालीं दिले आहेत. अर्थात् ठळक ठळकच दिले आहेत. इतर बारीक सारीक अनेक ग्रंथ आहेत.








१ १५८०-१६५० भट्टोजी दीक्षित–
सिद्धांत कौमुदी, प्रौढ मनोरमा, शब्दकौस्तुभ.

२ १६५०-१७०० हरि दीक्षित–
लघु व बृहत् शब्दरत्न (प्रौढ मनोरमेवरील टीका ग्रंथ).

३ १६७४-१७७५ नागोजीभट्ट काळे–
परिभाषेंदुशेखर, लघु व बृहत् शब्देन्दुशेखर, लघु-मंजूषा वगैरे. ( एकंदर ४० ग्रंथ लिहिले. )

४ १६९०-१७८० वैद्यनाथ पायगुंडे–
चिदस्थिमाला ( शब्देन्दुशेखरावर टीका ), गदा ( परिभाषेंदुशेखरावर ).

५ राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर– त्रिपथगा } परिभाषेंदुशेखरावरील टीका
६ विष्णुशास्त्री भट-रदोद्धेदिनी }

७ धोंडशास्त्री भट-चिचंद्रिका – शब्देंदुशेखरावर टीका

८ बाळशास्त्री रानडे – भूति.

९ सदाशिव भट्ट घुले – भट्टि.

१० कोंडभट्ट – वैयाकरणभूषण.

११ १८६३-१९४२ म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर – यांनीं एकंदर २५ ग्रंथ लिहिले. त्यांत 'पातंजल महाभाष्याचा मराठी अनुवाद' ६ खंड, 'तत्त्वादर्श' परिभाषेंदुशेखरावरील टीका हा व्याकरणविषयक ग्रंथ असून इतर वेदान्त व अन्य विषयांवर आहेत. श्रीभाष्यावर संस्कृत टीका, सर्व-दर्शनसंग्रहावर संस्कृत टीका, ब्रह्मसूत्रशांकरभाष्याचा मराठी अनुवाद, मीमांसा-न्यायप्रकाश टीकेसह, अद्वैतामोद, पातंजलयोगसूत्र भाष्य व टीका वगैरे मुख्य आहेत.

१२ विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचा मराठी अनुवाद, प्राचीन व मध्ययुगीन कोश, अनेक सूचिग्रंथ.

१३ म. म. प्रा. काशिनाथ वासुदेव अभ्यंकर – पातंजलमहाभाष्याचा अनुवाद, प्रस्तावनाखंड वगैरे.

वर ग्रंथकार व त्यांनीं संस्कृत व्याकरणविषयक लिहिलेले ग्रंथ यांचींच नांवें मुख्यत्वें करून दिलीं आहेत. महाराष्ट्राशिवाय इतर भागांतील पंडितांचीं नांवें व त्यांनीं लिहिलेले ग्रंथ अर्थातच येथें दिले नाहींत. राजाश्रयाच्या अभावीं ही पंडितपरंपरा लुप्त होत आहे. जुन्या पिढींतील पंडितांचे पुत्र व पौत्र आंग्लविद्याविभूषित होऊन उच्च पदस्थ आहेत. जुन्या पोथ्या वाण्याच्या घरीं रद्दीच्या भावानें जाऊं लागल्या ! पोट बांधून विद्येसाठी विद्या शिकणाऱ्यांची पिढी संपली ! भट, साठे, अभ्यंकर, गजेंद्रगडकर, आगाशे, अष्टपुत्रे, घुले, घाटे, वळे, भारद्वाज, गोड-बोले हीं प्रसिद्ध वैयाकरण कुलें आज त्या उपनांवानें अस्तित्वांत असलीं तरी घराण्यांत विद्या जीवंत ठेवणारे किती आहेत ?

## आशेचे किरण

पण याहि काळोखांत आशेचे किरण दिसूं लागले आहेत. संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्न सुरू झाले आहेत. निदान तशी भाषा तरी कानांवर येत आहे. संस्थानें विलीन झाल्यामुळें संस्कृतपाठशालां-ना कोणी त्राता न राहिल्यानें त्याहि लीन आणि दीन होऊन विलीन झाल्या. अशा परिस्थितींत पाठशालांची माहिती गोळा करण्यासाठीं मुंबईराज्य सरकारनें एक समिति नेमली आहे; तर केंद्रसरकार-नेंहि एक समिति नेमून पुण्याचे डॉ. रा. न. दांडेकर यांची कार्यवाह म्हणून नियुक्ति केली आहे. 'संस्कृत-विश्वविद्यापरिषद' स्थापन होऊन चार वर्षें झालीं. तिचे अध्यक्ष प्रत्यक्ष राष्ट्रपति डॉ. राजेंद्र-प्रसाद आहेत. पुण्यास नामदार बाळासाहेब खेर हे मुंबईराज्याचे पंतप्रधान असतांना त्यांच्या उत्तेजनानें टिळक संस्कृत महाविद्यालयांत अध्यापनाचें काम सुरूं होऊन सात वर्षें झालीं. त्या मंडळाचे अध्यक्ष प्रा. काशिनाथपंत अभ्यंकर आहेत. पण अजून संस्थेनें बाळसें धरावें तसें धरलें नाहीं. शिष्यवृत्त्या व इतर मदतहि विद्यार्थ्यांस दिली जाते. अनुभवी पंडितहि अध्यापनाचें काम करितात. पण दीक्षान्त शिक्षण झाल्यानंतरहि पोटापाण्याची शाश्वती नाहीं

असें वाटत असल्यामुळें हुषार विद्यार्थी सहसा या महाविद्यालयांत जात नाहींत. गुरुजींना विचारल्यास ते 'न कोपि आयाति' असें सांगतात ! पण 'यत्ने कृते यदि न सिध्यसि कोऽत्र दोषः' असें समजून प्रयत्न चालू ठेवणें इष्ट आहे.

टिळक संस्कृत महाविद्यालयाप्रमाणें इतरहि संस्था भरीव काम करीत आहेत. भांडारकर संशोधन मंडळानें आज जवळ जवळ ३०।४० वर्षें काम करून महाभारतासारख्या प्रचंड ग्रंथाचें संशोधन पूर्ण करीत आणिलें आहे. जुन्या दुर्मिळ पोथ्यांचा संग्रह करून, त्यानें संशोधन करून, यथानिधि त्या प्रसिद्ध करणें व एम्. ए. व पीएच्. डी. या पदव्यांसाठीं विद्यार्थी तयार करणें इत्यादि कामें थोड्या वेतनावर पंडित करीत आहेत. तर इकडे डेक्कन कॉलेज संशोधन केंद्र सरकार चालवित असून संस्कृत महाकोशाचें प्रचंड कार्य डॉ. कत्रे करित आहेत. त्यांना साहाय्य करणारे प्राचीन व अर्वाचीन पद्धतीनें शिकलेले पंडित व पदवीधर तत्परतेनें कार्य करीत आहेत. जुन्या पंडिती विद्येला नवें लेणें चढविलें जात आहे. पांक्त अध्ययनाबरोबर ऐतिहासिक दृष्टीहि आहे.

तिकडे वाईस प्राज्ञपाठशाळा पूर्वीपासूनच भरीव काम करीत आहे. ब्रह्मीभूत नारायणशास्त्री मराठे (केवलानंद) समाधिस्थ झाले तरी त्यांचे चतुरस्र शिष्य तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हें कार्य चालवीत आहेत. मीमांसा-धर्मकोशासारखे प्रचंड ग्रंथ अनेक भागांत प्रसिद्ध होत आहेत. डॉ. बेलवलकरांनीं चालविलेलें संस्कृत कॉलेजहि अस्तित्वांत आहे. नागपूरकडील भागांतील इतिहास स्वतंत्रच दिला पाहिजे.

या सर्व परिस्थितीवरून अजूनहि संजीविनीविद्येनें या परंपरागत विद्येचें पुनरुज्जीवन होऊन भारताची संस्कृतिज्योत तेवत राहील अशी आशा आहे.

—

## अशा दुपारच्या वेळीं —

अशा दुपारच्या वेळीं
गर्द सांवली लिंबाची
होती मनांत झुरत
ओढ लागुन सुखाची.

पंख मिटून पांखरूं
होतें बसलें खोप्यांत
देतां वाऱ्यानें जांभयी
उगी झालें भयभीत.

होती पेंगुळली आई
बाळ घेऊन कुशींत
संसाराचे परिश्रम
चिंब भिजल्या घामांत.

आभाळाचे मनोगत
दिशांमधून पेटले
प्रासादाच्या आडोशाला
भिकारीण तळमळे ...

मोगरीच्या वेलीवर
एक कोमेजली कळी
घेत कानोसा बसली
अशा दुपारच्या वेळीं ...

— तु. शं. कुलकर्णी

३ वरील धावत्या आढाव्यांत कांहीं कुलें व कांहीं प्रसिद्ध पंडितांचीं नांवें दृष्टींतून सुटली असण्याचा संभव आहे. उदा० वाईचे भाऊशास्त्री लेले, भिडे, बापट वगैरे. त्याबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे. वऱ्हाड-नागपुराकडील घराण्यांची माहिती गोळा करीत असून ती स्वतंत्र देण्याचा विचार आहे. ज्यांना अधिक व बिनचूक माहिती असेल त्यांनीं ती माझ्याकडे पाठविल्यास उपकृत होईन. — लेखक

श्री. वि. ज. सहस्रबुद्धे आणि आचार्य शं. द. जावडेकर

# गीताविषयक चर्चा

## श्री. सहस्रबुद्धे यांचें पत्र

सन्माननीय आचार्य शं. द. जावडेकर यांचे सेवेशी

सादर सा. न. वि. वि.

नवभारत मासिकाच्या फेब्रुवारी १९५४ च्या अंकांतील ' भगवत् गीता आणि बुद्धिवाद ' हा आपला लेख मी वाचला. हा लेख चांगला आहे. मला आवडला. लो. टिळक व महात्मा गांधी यांच्या विचारसरणींतील अपुरेपण अगर संदिग्धपणा दाखविण्याचा प्रयत्न आपण या लेखांत केला आहे असें माझ्या अल्पमतीला वाटतें.

गीतेंतील एका गोष्टीचा नीट खुलासा मला कळला नाहीं म्हणून ती गोष्ट मी आपल्यापुढें नम्रपणें ठेवीत आहे. त्या बाबत आपल्याकडून स्पष्टता व्हावी. मी फार आभारी होईन.

" हें युद्ध धर्म्य नाहीं. युद्ध केल्यामुळें मला पाप लागेल " अशी अर्जुनाची तक्रार आहे. त्या तक्रारीचें योग्य उत्तर भगवन्तांनीं दिलें नाहीं असें मला वाटतें. श्रीकृष्णांच्या सांगण्यांतील तात्पर्य मी समजतों तें असें आहे :

" हें युद्ध अपरिहार्य आहे. युद्ध करणार नाहीं असें तूं म्हटलेंस तरी करावेंच लागेल " इतकेंच उत्तर कृष्णांनीं दिलें आहे.

आतां माझी शंका अशी आहे. " क्षत्रियानें युद्ध करावें, तो त्याचा धर्म आहे " ही गोष्ट गृहीत धरली तरी प्रत्येक युद्ध धर्म्यच असतें असें कसें म्हणतां येईल ? युद्ध करणारें प्रत्येक राष्ट्र अगर पक्ष आपली भूमिका न्याय्यच आहे असें म्हणत असतो. " हें युद्ध धर्म्य आहे व अपरिहार्य आहे " या दोन गोष्टी गृहीत धरूनच कृष्णांनीं अर्जुनास उत्तर दिलें आहे. " पांडवांचा सत्पक्ष आहे " ही गोष्ट अर्जुनास पटवून देणेच्या बाबतींत कृष्णाच्या उत्तरांत युक्तिवाद आढळत नाहीं. तेव्हां युद्ध करणें हा क्षत्रियाचा धर्म असला तरी प्रत्येक युद्ध धर्म्यच असेल असें नाहीं. धर्म्य किंवा अधर्म्य हें ठरविण्याची कसोटी गीतेंत सांगितली आहे काय अशी शंका मला येत आहे.

अनासक्त बुद्धीनें, शुद्ध बुद्धीनें युद्ध करावें, एवढें म्हटल्यानें ' युद्ध धर्म्यच आहे काय ' हा मूळ प्रश्न सुटला असें होत नाहीं.

" तूं निमित्तपात्र हो, हे सगळे भीष्म द्रोणादिक काळाच्या दाढेंत सांपडलेलेच आहेत " अशा प्रकारचें कृष्णाचें उत्तर बुद्धिवादाला किंवा युक्तीला पटत नाहीं.

" आत्मा अमर आहे " वगैरे तत्त्वज्ञान सुखदुःखातीत अवस्था प्राप्त करून घेण्याच्या दृष्टीनें विचारणीय आहे. परंतु युद्ध धर्म्य किंवा अधर्म्य असा प्रश्न उत्पन्न झाला असतां त्याचप्रमाणें युद्ध अपरिहार्य अगर परिहार्य आहे या प्रश्नाचा निर्णय करण्याच्या वेळीं " आत्मा अमर आहे " वगैरे तत्त्वज्ञानाचा उपयोग होत नाहीं. युद्धाचा विचार ऐहिक दृष्टीनेंच केला पाहिजे म्हणजे सर्व जनतेच्या हिताच्या दृष्टीनेंच केला पाहिजे. तेव्हां अध्यात्मतत्त्वज्ञानाचा उपयोग वरील प्रकारच्या प्रश्नांच्या प्रसंगीं होईल काय ? " युद्ध धर्म्य किंवा अपरिहार्य असें ठरल्यावर मग त्या युद्धापासून होणाऱ्या परिणामाबद्दल आपण अलिप्त कसें राहावयाचें ? याचा विचार अध्यात्मशास्त्र करूं शकेल व त्या दृष्टीनें अध्यात्मशास्त्राचा उपयोग आहे असें मी समजतों. तेव्हां








अध्यात्मशास्त्राची दृष्टि कोठें उपयोगांत आणावयाची व ऐहिक दृष्टि कोणत्या बाबतींत चालवावयाची, असें मुख्य दोन प्रश्न उत्पन्न होत असतात. या दोन्हींचा कित्येकवेळां गोंधळ होतो. तसा गोंधळ करून सांगणारे लेखक व वक्तेहि आढळून येतात. तेव्हां या प्रश्नांसंबंधीं भगवन्तांनीं गीतेंत उत्तरें दिलीं आहेत काय ? असल्यास ते गीतेंतील श्लोक कोणते व तीं उत्तरें समाधानकारक आहेत असें म्हणतां येईल काय ? असें हे माझे प्रश्न आपल्यापुढें ठेविले आहेत. या प्रश्नाची चर्चा अन्यत्र झाली असेलहि किंवा नसेलहि पण मला स्वतःच्या समाधानाकरितां हे प्रश्न आपल्यापुढें ठेवून या संबंधीं आपले विचार ऐकण्याची इच्छा आहे म्हणून आपणास तसदी देत आहे. क्षमा करावी

## आचार्यांचें उत्तर

आपलें पत्र पोंचलें. त्यांत विचारलेल्या प्रश्नांना थोडक्यांत उत्तर देत आहे.

(१) भगवद्गीतेंत पांडवांचा पक्ष हा सत्पक्ष आहे हें श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांनाहि मान्य असल्यामुळें धर्मयुद्ध केव्हां म्हणतां येतें व केव्हां म्हणतां येत नाहीं, याची चर्चा त्यांत नाहीं. तसेंच पांडवांना युद्धावांचून आपलें राज्य मिळविणें शक्य नव्हतें हेंहि त्यावेळपर्यंत ठरलेलेंच होतें. आपणांस राज्य मिळावें, हा न्याय आहे व त्या न्यायाची संस्थापना युद्धावांचून होऊं शकत नाहीं ही गोष्ट चर्चा करणाऱ्या दोघांनाहि मान्य होती. तेव्हा त्या विषयाची चर्चा त्या पुस्तकांत येण्याचें कारण नाहीं. आपल्या सर्वच शंकांचे समाधान करणारा तो ग्रंथ नसून त्यांत केवळ अर्जुनास आलेल्या शंकांचेंच समाधान केलेलें आहे. या दृष्टीनें आपण त्या ग्रंथाकडे पाहिलें पाहिजे.

(२) न्याय संस्थापनेसाठीं स्वजनांची हिंसा करणें, अपरिहार्य झाल्यास ती निर्वैर बुद्धीनें करावी कीं आपला न्याय्य हक्कहि सोडून द्यावा, एवढ्याच प्रश्नाचा विचार त्या ग्रंथानें केला आहे, व तोहि क्षत्रिय प्रकृतीच्या दृष्टीनें केला आहे.

(३) असें असलें तरी धर्मयुद्ध व अधर्मयुद्ध, यांतील विवेक करण्यास उपयोगी पडणारे विचार त्या ग्रंथांत आहेत. दैवी व आसुरी संपत्ति यांतील भेद विशद करतांना " इदं अद्य मया लब्धं । इदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ' तसेंच ' असौ मया हतः शत्रुः । हनिष्ये चापरानपि ' असें आसुरी वृत्तीचें वर्णन आहे. हें वर्णन पांडवांच्या पक्षास लागू आहे कीं कौरवांच्या पक्षास लागू आहे, याचा विचार करावा. स्वतःचें राज्य परत मिळविण्यासाठीं लढणें व दुसऱ्याचें राज्य बळकाविण्यासाठीं लढणें यांत सत्पक्ष कोणता ? त्यावेळच्या न्यायाच्या कल्पनेप्रमाणें वारसाहक्कानें राज्यें मिळत असत व त्याप्रमाणें पांडवांना राज्य मिळालें होतें. तें त्यांना परत मिळणें, वनवास व अज्ञातवास संपल्यावर योग्य होतें. पण ही न्याय्य गोष्ट करण्यास कौरव तयार नव्हतें किंवा अज्ञातवासाच्या मुदतीबद्दल उपस्थित झालेला तंटा निःपक्षपाती मध्यस्थाकडून सोडवून घेण्यासहि ते तयार नव्हते. अर्थात् रूढ न्याय-कल्पनेप्रमाणें आपलें राज्य आपणांस मिळविण्याटीं लढणें किंवा आपणांवर होणारा अन्याय सहन करणें, यांवाचून तिसरा मार्ग नव्हता. त्यांपैकीं अन्याय सहन करण्याचा मार्ग स्वीकारणें म्हणजे आसुरी वृत्तीला प्रोत्साहन देणेंच होय. श्रीकृष्णाला हें मान्य नव्हतें व तें जगत् हिताच्या दृष्टीनें सुद्धां विघातक आहे. म्हणून निरहंकार व निर्मम वृत्तीनें स्वजनाविरुद्धहि न्यायसंस्थापनेसाठीं लढणें हें तुझें कर्तव्य आहे मग त्याचे परिणाम कांहींहि होवोत, अशी श्रीकृष्णाची विचारसरणी आहे. त्या वेळच्या न्यायाच्या कल्पना व न्यायसंस्थापनेचे सर्वसंमत मार्ग, यांच्यावर ही विचारसरणी उभारलेली आहे. आजच्या परिस्थितींत त्या कल्पना आपणास पटतीलच असें








नाहीं. पण राज्यशास्त्र व नीतिशास्त्र यांच्यांतील आजच्या कल्पना श्रीकृष्णाला व अर्जुनाला लागू करणें बरोबर नाहीं.

( ४ ) साधूंचें संरक्षण व दुष्टांचा नाश, या तत्त्वावर भगवद्गीतेची उभारणी झालेली आहे. पण हें तत्त्वच मूलत: सदोष आहे. कारण पूर्णपणें साधू व पूर्णपणें दुष्ट, असे लोकच आढळत नाहींत. म्हणून दुष्टांचा नाश हें तत्त्व सोडून त्यांच्या मनांतील दुष्टपणाचा नाश, या तत्त्वावर नीतिशास्त्राला आपलें अधिष्ठान बसवावें लागतें. असें असलें तरी व्यवहारदृष्टीनें दुष्टांचा नाश हें तत्त्व पूर्णपणें सोडतां येत नाहीं. पण दुष्टांचा नाश हें तत्त्व सदोष आहे हें विसरतां कामा नये. दुष्ट कोणास म्हणावें व त्यांना शासन किती करावें, हे प्रश्न सामान्य सामाजिक व्यवहारांत कायदा व न्यायदान, या पद्धतीनें सोडविण्यांत येतात. पण राज्यांच्या बाबतींत असा कायदा व न्यायपद्धति किंवा न्यायासन अद्यापि पूर्णपणें अस्तित्वांत आलेली नाहींत म्हणून युद्ध हा मार्ग अद्यापि अवलंबिण्यांत येत असतो. ज्या मानानें सामाजिक व्यवहार गुंतागुंतीचे व परस्परावलंबी होत आहेत त्या मानानें सुष्ट व दुष्ट यांच्यांत विवेक करणें कठीण होऊं लागलें आहे व दुष्टांना मारतांना सुष्टांना मारणें अपरिहार्य बनू लागलें आहे; म्हणून आज युद्धसंस्था नष्ट करणें अगत्याचें होऊन बसलें आहे. पूर्वीपासूनच थोड्याफार अंशानें हा प्रकार होताच. पण आज हा प्रकार इतक्या प्रमाणांत वाढला आहे कीं आज धर्मयुद्ध किंवा अधर्मयुद्ध असा भेद करणें अशक्य होऊं लागलें आहे. पण त्याचबरोबर अन्याय सहन करून जगावयाचें नाहीं. अन्यायाचा प्रतिकार व न्यायाची संस्थापना करण्यासाठीं प्राण असेपर्यंत झगडा चालू ठेवावयाचा, ही वृत्ति मरूं देतां कामा नये. जर ही वृत्ति मरूं देऊन युद्धाचा मार्ग सोडून दिला तर तें मानवसंस्कृतीला विघातकच ठरेल. म्हणून न्यायसंस्थापनेसाठीं लढण्याचा अहिंसक पर्याय सत्याग्रहानें शोधून काढला आहे. त्याचा विकास करणें हाच आजचा धर्म आहे. युद्धाच्या मार्गानें न्यायसंस्थापना होऊं शकते हें आज तरी पटण्यासारखें नाहीं. पण अन्याय सहन करणें हा मार्ग मात्र उन्नतिकारक नाहीं. म्हणून अन्याय सहन करण्यापेक्षां न्यायासाठीं शस्त्र वापरणें हें आजहि श्रेष्ठ ठरेल. मात्र निर्विकारबुद्धि व न्यायनिष्ठा या वृत्ती कायम ठेवून हा लढा केला पाहिजे. कांहीं झालें तरी न्याय विरुद्ध अन्याय हा लढा चालू ठेवण्यांतच मनुष्याचें मनुष्यत्व आहे. तो सोडून देण्यापेक्षां न्यायासाठीं लढण्याच्या वृत्तीनें युद्ध होऊन सर्व मनुष्य-जात नष्ट झाली तरी बिघडलें काय ? अन्याय सहन करणारा मनुष्य जगला तरी त्यांत समाधान कसलें ?

( ५ ) म्हणून आजच्या मनुष्यानें युद्धाच्या मार्गानें सर्व मनुष्यजात नष्ट होणार आहे हें ओळखून सत्याग्रहाची दीक्षा घेतली पाहिजे. मनुष्यजातीचा अन्त टाळून तिची उन्नति करण्याचा हाच मार्ग आहे. पण हा मार्ग ज्यांना झेंपत नसेल किंवा पटत नसेल त्यांनीं अन्याय सहन करण्याचा मार्ग मात्र केव्हांहि स्वीकारतां कामा नये एवढाच बोध भगवद्गीतेपासून आजच्या मानवांना घेतां येईल. पण भगवद्गीतेच्या काळीं धर्मयुद्धानें लोकसंग्रह होऊं शकेल असा जो विश्वास होता तो आज कोणाहि विवेकी मनुष्यास उरलेला नाहीं. म्हणून भगवद्गीतेचा अर्थ अधिक वाढवून शस्त्रयुद्धाचा अहिंसक पर्याय दाखवून देणारे कर्मयोगी हेंच भगवद्गीतेचें खरें रहस्य जाणतात. व तेच आजच्या मानवाला आत्मोद्धाराचा व लोकसंग्रहाचा मार्ग दाखवून देऊं शकतील अशी माझी निष्ठा आहे. याच दृष्टीनें गांधींनीं गीतेचें खरें रहस्य ओळखिलें असें मी मानितो.

२७।२।५४








श्री. शं. वा. किर्लोस्कर

# कै. लक्ष्मणरावजी किर्लोस्कर : व्यक्तिमत्व व जीवनकार्य

ता. २६ सप्टेंबर रोजीं सकाळीं पुण्याहून टेलिफोन आला कीं श्री. लक्ष्मणरावजी किर्लोस्कर थोड्या वेळापूर्वीच हें जग सोडून गेले; तेव्हां त्या दुष्ट वार्तेमुळें वाडींत सर्वत्र हाहा:कार उडाला ! कारखाना तावडतोब थांबला ! कामगार बाहेर आले ! सर्वजण स्तब्ध ! या स्तब्धतेमुळें श्री. लक्ष्मणरावांच्या वियोगाची जाणीव अधिकच तीव्रतेनें होऊं लागली. सर्वच दु:खांत बुडालेले. त्यांत कोणाचें सांत्वन कोणी करावें ?

काकांना हृदयविकाराची व्यथा जडल्याचें समजल्यापासून अलीकडे त्यांच्याविषयीं आम्हाला चिंता वाटूं लागली होती. तथापि ते इतक्यांत आपली जीवनयात्रा पुरी करतील असें मात्र वाटत नसे. काकांचा बांधा थोराड नसला, तरी काठी बळकट. त्यांच्या सान्निध्यांत माझी पन्नासाहून जास्तच वर्षे गेलेली, पण एखाद्या आजारानें त्यांनीं अंथरूण धरल्याचें मला आठवत नाहीं. फार काय ते कधी थकून हुश्य करीत बसल्याचेंहि मला माहीत नाहीं. दमणें हा शब्द जणू त्यांच्या कोशांतच नव्हता, आणि म्हणूनच त्यांचें वय नव्वदाच्या घरांत आलें तरी रोज सात आठ तास राबल्याशिवाय त्यांना चैन पडायचें नाहीं. अलीकडे हा वेळ ते शेतांत घालवीत. तेव्हां वर्षानुवर्षे असा अविश्रांत उद्योग करणारा खंबीर पुरुष कसल्याहि आजाराला पुरून उरल्याशिवाय राहाणार नाहीं हा आमचा विश्वास.

काकांची प्रकृति अशी खणखणीत तर त्यांचा मनोनिग्रह व निश्चय त्यापेक्षां खंबीर. त्यांनीं एखादी गोष्ट करायचें मनावर घेतल्यावर ती पुरी केल्याशिवाय ते कधीं सोडायचें नाहींत. गोष्ट कितीहि अवघड असो, अथवा ती शेवटास नेण्यांत कितीहि अडचणी येवोत. कोणताहि प्रयत्न ते कधीं अर्धवट सोडून देत नसत. त्यांचा निश्चय म्हणजे भीष्मप्रतिज्ञाच. म्हणूनच त्यांच्यासाठीं, त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव श्री. शंतनुराव जर्मनीला निघण्याचा स्वत:चा बेत रद्द करण्याच्या विचारांत आहेत असें पाहतांच लक्ष्मणरावांनी त्यांना निक्षून सांगितलें- "तू खुशाल जा, कारखान्याचं काम अगोदर व्हायला हवं. माझी काळजी नको, मी अजून कांहीं वर्षे जगणार आहे" ही प्रतिज्ञा मात्र काकांना पार पाडतां आली नाहीं हें आमचं दुर्दैव !

## काकांचे पूर्वचरित्र

लक्ष्मणरावांच्या अद्भुत व अपूर्व कर्तबगारीचा चित्रपट मला बऱ्याच प्रारंभापासून पाहायला मिळाला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. मी मुंबईला प्रथम १८९८ सालीं गेलों, तेव्हां ते ठाकुरद्वारजवळ झावबाच्या वाडींत मंडलिकांच्या वाड्यांत राहात असत. त्यावेळीं ते टेक्निकल इन्स्टिट्यूटमध्यें ड्रॉईंगमास्तर होते. वाड्यामागें नारळीची बरीच झाडें असत. वाड्याला लागून एक चिमुकलें शेड होतें. त्यांत डॉक्टरांना लागणाऱ्या कागदी डब्यांचा कारखाना चालू असे. त्यांत काम करणारे कामगार म्हणजे दोन छोकरे. दीड दोन हजार रुपयांच्या भांडवलावर चालणारा हा झोपडींतला कारखाना; तेव्हां त्याचा पसारा अथवा किफायत किती असेल याची कल्पना द्यायला नको.

माझे वडील डॉक्टर असले तरी त्यांना यांत्रिक विषयांची फार आवड. म्हणून सोलापुरास आमच्या घराशेजारीच त्यांनीं शिवाजी वर्क्स हा कार-








खाना सुरू केला. लक्ष्मणराव तेवढ्यासाठीं सोलापुरास येत व दोघा बंधूंचे कारखान्यासंबंधी अनेक बेत चालत.

पुढें लक्ष्मणरावांनीं मुंबईची नोकरी सोडून, ते बेळगांवास आले. तिथें त्यांचे सर्वांत वडील बंधू रामुअण्णा हायस्कूलमध्यें शिक्षत होते. शहरापासून तीन मैलावरच्या एका माळावर दोघे शेजारी झोंपड्या घालून राहूं लागले. व कँपमध्यें किर्लोस्कर बंधु या नांवाचें त्यांचें सायकलविक्रीचें दुकान सुरू झालें. माझ्या वडिलांनीं त्याच सुमारास हायस्कूल शिक्षणासाठीं माझी बेळगांवला थोरल्या काकांकडे रवानगी केली. शाळेंतून परत येतांना केव्हां केव्हां आमच्या सायकलच्या दुकानांत मी थोडा वेळ थांबत असे. तिथे दुकानामागील शेडमध्यें हाताखालच्या एकदोन लोहारांस घेऊन लक्ष्मणराव कांहींतरी नवीन वस्तु करण्याच्या सारखे खटाटोपांत असायचे. तिथेच त्यांनी कडबा कापण्याचें पहिलें यंत्र १९०० साली तयार केलें. इथपासून किर्लोस्कर कारखान्याची खरी सुरुवात झाली असें म्हणतां येईल.

## आत्मविश्वास व अष्टपैलुत्व

एवढ्यांत औंधच्या राजेसाहेबांकडून तिथल्या श्रीयमाईदेवीच्या देवळापुढें एक टोलेजंग मंडप बांधण्याचें कंत्राट लक्ष्मणरावांनीं मिळविलें. हाहि त्यांचा एक विक्रमच. ज्यांना कधी लहान घरकुल बांधण्याचाहि अनुभव नाहीं, त्यांनी हजारो रुपये किंमतीची भव्य इमारत बांधण्याचें काम पत्करावें ही सामान्य करामत नाहीं. पण लक्ष्मणरावांनीं तें नुसतें पत्करलेंच नाहीं तर अतिशय उत्कृष्टपणें पार पाडलें.

हेंच काय, पण कारखाना चालवितांना कुठल्याहि तऱ्हेचें नवें काम निघो, काका एखाद्या माहितगारासाठीं कधी अडून बसत नसत. याचें कारण त्यांनी इतक्या विविध प्रकारचीं कामें स्वतः हातानें केली होतीं, यांत्रिक विषयावरील अमेरिकन मासिकांचें त्यांचें वाचन इतकें अखंड चाललेलें असे व त्यांनी संपादन केलेला अनुभव इतका प्रचंड होता कीं त्यांची गति अमुक एका उद्योगांत चालत नाहीं असें कधी व्हायचें नाहीं. आणि हें खरेंच कीं कोणत्याहि क्षेत्रांत एक नवा मनू सुरू करणाऱ्या व्यक्तीच्या अंगीं जसा विलक्षण आत्मविश्वास असावा लागतो तसेच त्यांना अष्टपैलुत्वहि असावें लागते. अनेकांच्या भूमिका त्यांना एकट्यानें पार पाडाव्या लागतात. अण्णा किर्लोस्करांनी मराठी रंगभूमींत प्रचंड क्रांति घडवून आणली, पण त्यासाठीं त्यांना स्वतः नट, नाटककार, संगीततज्ज्ञ व सूत्रधार अशा विविध स्वरूपांत स्वतःची प्रतिमा व कौशल्य प्रकट करावें लागलें.

## सर्वांचे 'पप्पा'

त्याचप्रमाणें लक्ष्मणराव नुसते एक हुषार यंत्रज्ञच नव्हते तर त्याचबरोबर यशस्वी धंद्याला लागणारे व्यापारी ज्ञानहि त्यांना भरपूर होते. शिवाय हाताखालच्या लोकांवर वचक ठेवून त्यांच्याकडून शिस्तींत व मनापासून काम करून घेण्यास जो पुढारीपणा व कौशल्य लागतें, तेंहि काकांच्या अंगीं उत्कटपणें वसत असे. कमांत कोणी चुकारपणा अगर निष्काळजीपणा केलेला त्यांना कधी खपत नसे. तथापि कोणी लक्षपूर्वक व नीट काम केलें कीं त्याचें कौतुकहि तितक्याच प्रेमानें ते करीत असत. तिथे हा माझा जवळचा, हा दूरचा हा भाव दिसायचा नाहीं. मग तो शिदप्पा लोहार असो, रामा बढुर असो, पिरा मांग असो नाहींतर तात्या न्हावी असो. काकांना सारेजण 'पप्पा' म्हणत. आणि खरेच त्यांचे कामगारांशीं संबंध पितापुत्राला शोभतील असेच असत.

म्हणूनच लक्ष्मणरावांचें देहावसान झाल्यावर त्यांचें शव अंत्यविधीसाठीं किर्लोस्करवाडीला आणले तेव्हां त्यांच्या दर्शनासाठीं एक मोठी जत्राच भरली












व अनेक जणांचीं अंतःकरणें दुःखानें भरून येऊन त्यांच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. आपलें आज छत्र गेलें हीच जणूं सर्वांची त्यावेळची भावना.

## ' केल्यानें होत आहे रे '

एका चिमुकल्या सायकलच्या दुकानापासून सुरुवात करून लक्ष्मणराव सुधारलेल्या लोखंडी नांगराचे भारतांतील आद्य व सर्वांत मोठे कारखानदार झाले. दरसाल पन्नास साठ हजार नांगर, लक्षावधि फाळ किर्लो-स्करवाडींतून प्रसार होऊं लागले. त्याच्याच तोडीला उसांच्या चरखासारखी शेतीला उपयोगी पडणारीं आण-खीहि यंत्रें आम्ही तयार करूं लागलों. लक्ष्मणरावांचे केवळ पैशाकडेच लक्ष असते तर त्यांना आतां कशाची ददात राहिली नव्हती. पण काकांना स्वस्थता माहीत नाहीं. त्यांचा उद्योग अविश्रांतपणें चालू. त्यांची दृष्टी नेहमीं पुढें असायची. शेतकरी सध्या बैलाच्या शक्तीवर अवलंबून आहेत. पण हळूहळू ते आपले काम तैलयंत्रानें अथवा विजेनें करूं लागतील, कारखान्यांची वाढ होऊन देशांत मशीनटूल्सची मागणी वाढूं लागेल, तेव्हां ही ऑईल एन्जीन्स, अिलेक्ट्रिक मोटर्स व मशीन-टूल्सची निर्मिति आपल्या देशांत झाली पाहिजे हे त्यांच्या मनानें घेतले व ते प्रयोग हाताशीं असलेल्या साधनसामग्रीनेच त्यांनी चालू केले. त्यांचा तो खटाटोप म्हणजे भगीरथ प्रयत्नच. किर्लोस्करवाडीच्या कारखान्यांत तयार झालेले इंजिन व पंप पुण्यास १९२६ सालीं भरलेल्या शेतकी प्रदर्शनांत मांडण्यांत आली. लक्ष्मणरावांचा तो एक मोठाच विक्रम होता. लक्ष्मणरावांनीं या नव्या उद्योगांची अशी उत्कृष्ट मुहूर्तमेढ रोंविली, म्हणूनच त्यांच्या यांत्रिक बुद्धिमत्तेचा वारसा मिळालेल्या त्यांच्या कर्तृत्ववान चिरंजीवांनी पुढें पुणें, हरिहर, बंगलोर येथें या विविध यंत्रांचें स्वतंत्र मोठे कारखाने उभारून राष्ट्राची थोर सेवा चालविल्याचे आज आपल्यास दिसते. या सर्व किर्लोस्कर कारखान्यांत आज पांच हजारावर लोक काम करीत असून वर्षाला चार कोटी रुपये किंमतीच्या मालाची निर्मिति त्यांतून होत आहे.

खिशांत पैसा नाहीं. अथवा कोणाचा पाठिंबा नाहीं अशा स्थितीत धारवाड सोडून मुंबईला नशीब काढण्यासाठीं आलेल्या एका सोळा वर्षाच्या मुलानें आपल्या हयातींत एवढें अपूर्व कार्य करून दाखवावें, याला तोड सांपडणें कठिण. ' केल्यानें होत आहे रे आधी केलेच पाहिजे ' या श्री. समर्थांच्या उक्तीचे एक उज्ज्वल उदाहरण म्हणजेच श्री. लक्ष्मणरावांचें जीवन. हाच स्फूर्तिदायक मंत्र इतरांसहि ते देत. काकांनी अशा प्रकारची प्रेरणा किती जणांना देऊन त्यांचें जीवन यशस्वी व उद्योगपूर्ण केलें आहे याची यादी द्यायची तर ती फार मोठी होईल.

किर्लोस्करवाडीचे सुरुवातीचे दिवस मला या वेळीं आठवतात. बेळगांवचा कारखाना ठळकवाडीं-तून हालवून कुंडलरोड स्टेशनजवळच्या माळावर आम्ही आलों तेव्हां येथें काय होते ? एक निवडुंगानें भरलेला ओसाड जमिनीचा तुकडा, जवळपास चिटपांखरू नाहीं. तथापि लक्ष्मणरावांच्या दिव्य दृष्टीला येथें एक विशाल कारखाना व आनंदी माणसांनी गजबजलेली एक नमुनेदार वसाहत दिसत होती. या जागेचा त्यांनी नकाशा काढला त्यांत कारखाना, गांव, मुलांसाठीं शाळा, वाचनालय, हॉस्पिटल, समाजमंदिर, क्रीडांगण इ० इ० ची मांडणी त्यांनी अगोदरच केली. त्यांच्या हाताखालीं काम करणारे शंभोराव जांभेकर, अनंतराव फळणीकर, नागूदादा ओगले, भाऊराव (कर्मवीर) पाटील, मंगेशराव रेगे, केके, गणपतराव विजापुरे व मी अशांसारख्यापुढें हें स्वप्न ते इतक्या तन्मयतेनें रेखाटीत कीं आम्ही सारेजण त्यामुळें भारून जाऊन आपापलीं कामें अत्यंत हिरीरीनें व उत्साहानें



अनुक्रमणिका






पार पाडायला पुढें यायचे. मोठमोठीं कामें पार पाडायला पैशाचें पाठबळ हवें. पण जिथें पैशाचा अभाव असेल तिथें माणसांचा उत्साह व त्यांची संघटित शक्ति केवढा चमत्कार घडवूं शकते हें पाहावयाचें असल्यास किर्लोस्करवाडीकडे बोट दाखवितां येईल. मात्र त्याला लक्ष्मणरावांच्यासारखा प्रभावी नेता पाहिजे. 'योजकस्तत्र दुर्लभः' हें खोटें नाहीं.

## एक थोर समाजसुधारक

लक्ष्मणरावांच्या सारख्या औद्योगिक क्षेत्रांत वाहून घेतलेल्या व सदैव त्या कार्यांत मग्न असलेल्या गृहस्थाचा सामाजिक सुधारणेशीं काय संबंध असें एखाद्यास वाटेल. पण अशी व्यक्ति समाजसुधारक म्हणून सुद्धां केवढें अजब काम करूं शकते हें पाहिल्यास मन थक्क होतें. किर्लोस्करवाडीला कारखाना आला तेव्हां वाडीच्या स्थापनेबरोबर शिवाशिवीचा व विटाळाचा प्रश्न आला. सुमारे पन्नास वर्षांपूर्वी या रूढी किती कडक होत्या याची पुष्कळांस आज कल्पना येणें शक्य नाहीं. कारखान्यांतल्या कामगारांत अस्पृश्यांचा भरणाहि बराच. त्यांना कारखान्यांतच समानतेची वागणूक मिळे इतकेंच नाहीं तर वाडींतहि अस्पृश्यतेला बंदी घालण्यांत आली. वाडींत स्पृश्यास्पृश्य एकत्र निःसंकोचपणें वागत, एवढेंच नव्हे तर श्रावणीसारखे धार्मिक सणहि एकत्र साजरे करीत. शेजारच्या गांवांतील स्पृश्य पुढाऱ्यांना या गोष्टी झोंबल्याशिवाय कशा राहातील ? त्यांनीं शंकराचार्यांपर्यंत गाऱ्हाणें नेलें. पण डॉ. कुर्तकोटी वाडीला आल्यावर लक्ष्मणरावांचेंच धोरण त्यांना मान्य झालें व त्यांना त्यांनी आपला पाठिंबा दिला. हीच गोष्ट दारूबंदीची. किर्लोस्कर कारखान्यांतील कामगारास दारूपासून अलिप्त ठेवल्यानें त्यांचा किती प्रकारे लाभ झाला आहे हें या भागांतील सर्वांस माहीत आहे. मात्र कामगारांस निर्व्यसनाचे धडे द्यावयाचे तर स्वतः चालकानें व्यसनापासून अलिप्त असावयास हवें. लक्ष्मणरावांचा या बाबतींतला सोवळेपणा अतिशय तीव्र. जन्मांत त्यांनी सुपारीचें खांड सुद्धां तोंडांत टाकलें नाहीं. त्यांच्यापुढें परत्याचें नांव काढायचीहि कुणाची छाती व्हायची नाहीं. काकांची ही निर्व्यसनता त्यांचें शुद्ध व साधें वर्तन आणि त्यांचा सरळपणा यांचा त्यांच्या हाताखालच्या व कुटुंबांतील मंडळीवर आपोआप प्रभाव पडे.

लक्ष्मणरावांच्या व्यक्तिमत्वाचे असे निरनिराळे पैलू आणखी कितीतरी सांगतां येतील. पण तो विस्तार फार होईल. म्हणून एवढ्यावरच आवरतें घेतलें पाहिजे. तथापि या त्रोटक व्यक्तिचित्रावरून देखील लक्ष्मणरावांच्या असामान्य व आदर्श चरित्राची कोणासहि कल्पना आल्याशिवाय राहणार नाहीं.

## अनेक लक्ष्मणराव हवेत

आतां शेवटी एकच विचार डोळ्यापुढें येतो. एक लक्ष्मणराव गेले. पण असले आणखी दुसरे लक्ष्मणराव आपल्या देशास कसे लाभतील ? कारण आर्थिक व औद्योगिक दृष्ट्या भारत सुसंपन्न व्हावयाचा असल्यास केवळ कागदावरील योजनांनी तें काम तडीस जाणार नाहीं. तर लक्ष्मणरावांसारख्या कल्पक व प्रयत्नवादी उद्योगवीरांच्या सतत परिश्रमानेच तें ध्येय लवकर गांठतां येईल हें निःसंशय. एकट्या सरकारच्या हातून हें प्रचंड कार्य उरकण्यासारखें नाहीं. तथापि अशा कार्यकर्त्यांचें उत्साहपूर्ण सहकार्य प्राप्त व्हावयाचें असल्यास सरकारकडून त्यांना जरूर तें उतेजन व संधि मिळावयास हवी. सरकारला देशाचा औद्योगिक विकास घडवून आणावयाचा आहे व देशांतील दारिद्र्य व बेकारी यांचे उच्चाटण लवकर व्हावें याबद्दल मोठी चिंता लागून राहिली आहे. तद्वतच देशांत समाजवादी समाजरचना स्थापन करून एक क्रांति घडवून आणण्याचेंहि उद्दिष्ट त्यानें डोळ्यापुढें ठेवलें आहे. हें सारें ठीक आहे. पण या समाजरचनेंत









व्यक्तीपेक्षां बहुजनसमाजाला अधिक महत्त्व प्राप्त होणार असल्यानें एखाद्या व्यक्तीच्या अंगीं कितीहि कल्पकता अथवा कर्तृत्व असलें, तरी तें प्रकट करून इतरांपेक्षां वर डोकें काढण्याचा त्याला वाव वेताचाच मिळणार असें दिसतें. लक्ष्मणरावांनीं निष्कांचन स्थितींत आपल्या जीवनाला सुरुवात केली, तरी त्यांनी आपल्या उद्योगानें व कष्टानें जो पैसा मिळविला तो फिरून कारखान्यांत गुंतवून त्या रोपाचा एक प्रचंड वृक्ष बनविला. या खटाटोपांत त्यांना कसली आडकाठी आली नाहीं. थोडक्यांत सांगायचें तर खाजगी प्रयत्नानें व हिमतीनें एखादी व्यक्ति केवढें असामान्य कार्य करूं शकते याचें एक उज्ज्वल उदाहरण म्हणून लक्ष्मणरावांकडे अंगुलिनिर्देश करतां येईल. 'नर करणी करे तो नरका नारायण हो जाय' हा सिद्धांत अशा व्यक्ती औद्योगिक क्षेत्रांत पूर्वी सिद्ध करून दाखवूं शकत. पण आतां अशी करणी करणाऱ्यांचा रस्ता बंद झाला आहे. कारण समाजवादी समाजरचनेंत 'फ्री एन्टरप्राईज'ला स्थान नाहीं. आणि लक्ष्मणराव तर फ्री एन्टरप्राईजचेच एक श्रेष्ठ फळ. तो जमाना आतां संपला. तेव्हां यापुढें महाराष्ट्रांत दुसरे लक्ष्मणराव पुढें येतील हा संभव अल्पच ! आपल्या सरकारपुढें सध्या सर्वांत मोठी समस्या कोणती असेल ती हीच. त्याला योग्य वाटेल अशी कोणत्याहि प्रकारची समाजरचना ते अस्तित्वांत आणोत तथापि त्या व्यवस्थेंत समाजांतल्या व्यक्तींचे अंगीं जे विशेष गुण, कल्पकता अथवा पराक्रम असेल, त्यांची खची न होईल अशा बेतानें समाजाची नवी घडी बसविण्याची काळजी त्यांनी घेतली पाहिजे. आज तसें होत नाहीं असें खेदानें म्हणावें लागते. ही फार मोठी चूक होत आहे, ती टाळली पाहिजे. कारण आपल्या देशाची प्रगति व भरभराट झपाट्यानें व्हावयाची असेल तर तें काम नुसते कायदे पास करून, घोषणा पुकारून अथवा व्याख्यानें देऊन होऊं शकणार नाहीं. तर भगीरथ प्रयत्न व अचाट कार्यकौशल्य लढवून तें उद्दिष्ट साध्य होऊं शकेल. लक्ष्मणरावांसारखीच माणसे हा पराक्रम करूं शकतील. येरा गबाळाचे तें काम नाहीं. असे अनेक लक्ष्मणराव भारताला आज हवे आहेत. संधी मिळेल तर ते निरनिराळया क्षेत्रांतून भराभर पुढेहि येऊं शकतील.

आमचें सरकार असे किती लक्ष्मणराव पुढे आणू शकते हें आतां पहायचें.

## सत्ता होईल जेव्हां भगवी—

सत्ता होईल जेव्हां भगवी
मानव्याची फिटतिल पापें
अशुभाचें रुप शुभांत बनतां
जळतिल हृदयें पश्चात्तापें ...

सुरांत जेव्हां मिळे तुतारी
षंढ अहंता फुंकुन जाई
ढांसळलेलें जुळवित असतां
ध्रुवांत कांहीं टिटवी गाई ...

सत्ता होईल जेव्हां भगवी
मानव्याची फिटतिल पापें
भरेल माया चराचरांतुन
सत्य-सुखाची अनंत मापें ...

— दत्ता कदम

## अथांग—

डोळे...
भोळे, चंचल, काळे,
त्यांनीं मला सांगितलें ... कांहीं ...
ज्यांतील मला नाकळलें कांहीं ...
आतां कळलें...
त्यांनीं मला सांगितलें जें ... तेव्हां,
म्हणुनि पुन्हां पाहियले
मीं डोळे
आज परंतु अथांग दिसले.

—— शांताराम जोग








डॉ. र. भ. कर्णिक

# अणुशक्ति आणि मानवाचें भवितव्य

ॲटम व हायड्रोजन बॉम्ब वगैरे अण्वादि संहारक शस्त्रांचा उपयोग सुरूं झाल्यापासून त्यांचे मानवी जीवनावर कोणते परिणाम घडून येतील याविषयीची चिंता विचारवंतांना वाटूं लागली. हिरोशिमा व नागासाकी येथें टाकलेल्या संहारक शस्त्रानें दुसरें महायुद्ध संपुष्टांत आल्याचा निःश्वास जनतेनें टाकला खरा पण आधुनिक संहाराचीं साधनें जितांना जितकीं वाईट तितकींच जेत्यांनाहि कांहीं कमी त्रासदायक होत नाहींत; आणि म्हणूनच ॲटमच्या घडाक्याच्या प्रथम शोधाचें फळ अमेरिकेच्या हातीं लागलें असलें तरी ' हें फल काय मम तपाला ' असें म्हणण्याची पाळी आज जित राष्ट्रांवर आली आहे.

## उत्क्रांतीचा संभव

अणूच्या विघटनामुळें काय परिणाम घडतात ह्याची चक्षुर्वै सत्यं माहिती आतां उपलब्ध झाली आहे. नागासाकी व हिरोशिमा व त्यानंतर बिकनी व इतर ठिकाणीं अण्वस्त्रें उडविल्यानंतर जे स्फोट झाले त्यांच्या परिणामांवरून शास्त्रज्ञांनीं ही माहिती गोळा केली व त्यावरून कांहीं अंदाज बांधले. अण्वस्त्रांच्या स्फोटामुळें प्रसरण होतें त्यामुळें भावी पिढीवर काय परिणाम घडतील ह्याबद्दलहि पुष्कळसें संशोधन चालूं आहे. प्रसरणाचा ( Radiation ) परिणाम गुणमण्यांवर ( Genes ) घडतो याबद्दल सर्व शास्त्रज्ञांचें एकमत आहे. उत्क्रान्तीच्या आधुनिक सिद्धांताप्रमाणें गुणमण्यांमध्यें जें आकस्मिक परिवर्तन ( Mutation ) घडतें त्यामुळें मानवी उत्क्रांति झाली असें मानलें जातें. अशा आकस्मिक परिवर्तनाचा परिणाम म्हणजे आजचा द्विपाद मनुष्यप्राणी होय ! हें परिवर्तन जननाण्ड व जननपेशींत घडण्याची क्रिया किरणांच्या प्रसरणामुळें अथवा कांहीं रसायनद्रव्यांच्या परिणामामुळें घडतें असा शास्त्रज्ञांचा निष्कर्ष आहे. परिवर्तनाच्या वाढत्या वेगामुळें उत्क्रान्तीचा जलद संभव निर्माण होतो. विश्वकिरण व भूमि अंतर्गत प्रसरणांचा परिणाम अनादि काळापासून गुणमण्यांवर चालूं आहेच. किंबहुना त्या क्रियेमुळेंच निसर्गांतलीं अनेक परिवर्तनें घडून आलीं आहेत. तेव्हां प्रसरणांचा ( Radiation ) अनुभव कांहीं नवीन नाहीं. एवढेंच कीं अणुशक्तीचा उपयोग विध्वंसनासाठीं, उत्पादनकार्यासाठीं, रोगपरिहारार्थ व इतर बहुविध कामासाठीं करण्यांत येत असल्यामुळें प्रसरणांची शक्यता कितीतरी वाढली आहे. अणुप्रमाणेंच क्ष-किरणांचा व तत्सम किरणांचा उपयोग समाजांत वाढत आहे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. ह्या सर्वांचे दृश्य वा अदृश्य परिणाम मानवी जीवनावर घडून येतात. हे परिणाम चांगले कां वाईट या संबंधीं शास्त्रज्ञांत आज विचारविनिमय चालूं झाला आहे.

## ताबडतोबीचे व दूरगामी परिणाम

प्रसरणांचे ताबडतोबीचे परिणाम म्हणजे शरीरावरील बाह्य बिघाड ( कातडी जळणें व कातडीचे भिन्न रोग ) व आयनीभवनामुळें ( Ionisation ) उत्पन्न होणारा लक्षणसमुच्चय होय ! पण त्यापेक्षांहि शरिरांतर्गत अनेक विकृति–पंडुरोग व इतर रक्तरोग, कॅन्सर, मोतीबिंदू आणि ह्या सर्व रोगांमुळें आयुष्याचें मान कमी होणें – निर्माण होतात. ह्याशिवाय शरीरांत प्रत्यहीं चालूं असलेल्या विविध

प्रकारच्या जीव-रसायन प्रक्रियेंत ( Biochemical-Process ) - रासायनिक सघट्टभवनाच्या प्रक्रियेंत ( Polymerisation ) बदल घडणें, प्रथिनांमध्यें ( Proteins ) विकृति संभवणें, आसवकारी-द्रव्यांच्या ( Enzymes ) कार्यांत बिघाड होणें— इत्यादि बदल घडून आल्यामुळें रंगसूत्रें ( Chromosomes ) व गुणमणी ( Genes ) ह्यांच्या स्वाभाविक रचनेंत बदल घडून येतात व अशा रीतीनें आन्त:शालिक ( Intracellular ) जीवनांत उलथापालथ होऊन जाते.

आपल्या शरीरांतील जननघटक ( Germinal Cells ) फारच संवेदनशील असतात. ह्या जननघटकांवर आयनीभवनाचे व अण्वादि प्रसरणांचे फार दूरगामी परिणाम घडून येतात. रंगसूत्रांच्या स्वाभाविक रचनेंत बदल होतांच रंगसूत्रविकृति ( Chromosome aberrations ) उद्भवतात; अर्थात् ह्या विकृति आणि बदल प्रसरणांची मात्रा ( Dose ) व आविष्करणाची प्रखरता ह्यावर मुख्यत: अवलंबून असतात.

बीजाण्डावर प्रसरणांचे होणारे तात्कालिक परिणाम म्हणजे वंध्यत्व, गर्भपात, जन्मत:च मेलेलीं मुलें होणें. हिरोशिमामध्यें ह्यासंबंधीं पुष्कळ उदाहरणें आढळून आलीं. त्याचप्रमाणें गर्भावस्थेंत असणाऱ्या मुलांच्या मेंदूची अर्धवट वाढ असलेलीं उदाहरणें पुष्कळ सांपडलीं आहेत.

प्रसरणांच्या शक्तीमुळें उत्क्रान्तीचा वेग वाढतो पण त्यामुळें मानवी वंश जास्त उन्नत होईल कां तो विकृत अगर नष्ट होईल ? असा एक यक्ष प्रश्न निर्माण झाला आहे आणि शास्त्रज्ञांच्या बुद्धीला तें एक मोठेंच आवाहन आहे.

### वांशिक बदल

पण आतांपर्यंतच्या शास्त्रीय चर्चेंतून एक गोष्ट उघड झालेली दिसते कीं गुणमण्यांवर ( Genes ) प्रसरणांचा होणारा परिणाम संकलनात्मक ( additive ) असतो. सोप्या शब्दांत सांगावयाचें झालें तर असें सांगतां येईल कीं प्रसरणाचा जोर अगर त्याची कालमर्यादा ह्यापेक्षां प्रसरणाच्या संकलित मात्रेवर हे परिणाम अवलंबून असतात; अधिक एक गोष्ट लक्षांत ठेवावयाला पाहिजे ती ही कीं, वांशिक बदल ( Genetic effects ) बीजाण्डांतील गुणमण्यांवर प्रसरणांचे परिणाम जेव्हां घडतात त्याचवेळीं घडून येतात. शरिरांतील इतर इंद्रियांतील गुणमण्यांवर कितीहि प्रसरणांचा परिणाम घडला तरी वांशिक बदल घडून येत नाहींत. त्याचप्रमाणें ज्यावेळीं आपण भावी पिढ्यांवर होणाऱ्या संभाव्य परिणामांचा विचार करावयाला लागतों त्यावेळीं विवक्षित माणसाच्या प्रजोत्पादकतेच्या काळांत ( Reproductive period ) त्याच्यावर प्रसरणाच्या किती मात्रेचें ( Dose ) आविष्करण झालें त्याची मोजदाद करणें आवश्यक असतें आणि त्याबाबतींत सर्वसाधारण नियम हा कीं बीजाण्डांतील गुणमण्यांवर बदल घडून येण्याच्या दृष्टीनें प्रसरणाची मात्रा आठवड्याला ·३ r प्रमाणें दरवर्षीं दहा आठवडे प्रमाणें दहा वर्षें दिली काय किंवा ३० r प्रमाणें एकदांच एक मिनीटभर दिली काय, दोन्हींचे परिणाम सारखेच होतील.

सर्वसाधारण माणसाला तें शास्त्रीय गौडबंगाल समजावयाला कठीण आहे पण ह्यांतून एक सर्वमान्य निष्कर्ष असा निघतो कीं, वंशशास्त्र, उत्क्रांतिशास्त्र आणि जीवशास्त्र हीं शास्त्रें लक्षांत घेतां सध्यांच्या काळांत जीं विविध प्रकारचीं प्रसरणें माणसावर आघात करीत आहेत त्यांचा मानववंशावर हितकारक परिणाम घडून येईल असें संभवत नाहीं; उलट तो घातक ठरेल असा संभव वाटतो.

गुणमण्यांत जे सूक्ष्म बदल प्रसरणांच्या आघातानें घडून येतात ते चालू अगर पुढील पिढींत दिसून येणार नाहींत. कारण पहिल्या अगर दुसऱ्या








पिढींत हे बदल दृश्य स्वरूपांत दिसावयाचे म्हटले तर गुणमण्यांतील बदल फारच ढोबळ असावयाला पाहिजेत, विकृत ( बदल ) गुणमणींचा वारसा घेऊन येणाऱ्या पुरुषांत असणारा फरक अगदींच थोडा असेल परंतु त्याचें लग्न तत्सम विकृत गुणमणी असणाऱ्या स्त्रीशीं झालें तर त्यांच्या अपत्यांत ढोबळ फरक दिसून येऊं शकेल. ही विकृति पुढील पिढ्यांतून पुढें पुढें सरकत जाईल आणि कदाचित् शंभर किंवा हजार वर्षांच्या काळांत ती विकृति अत्यंत भयंकर स्वरूपांत दिसून येईल. आणि त्यावेळेस ह्या विकृतीच्या प्रथम जनकाचाहि तलास काळाच्या उदरांत गडप होऊन जाईल. वंशशास्त्र अत्यंत गुंतागुंतीचें असल्यामुळें आजचे परिणाम पुढील पिढीवर कसे आणि किती होतील ह्याचा नक्की आराखडा एकदम मांडून दाखवितां येत नाहीं.

माणसाच्या रोजच्या जीवनांत कांहीं प्रसरणांचा परिणाम घडत असतोच पण अणुयुगाचा प्रारंभ झाल्यापासून मनुष्यनिर्मित प्रसरणांचा जास्त प्रादुर्भाव होत आहे हें निश्चित् ! ह्या वाढत्या माऱ्यामुळें पुढील काळांत मृत्युसंख्या वाढण्याची आणि जननसंख्या कमी होण्याची संभाव्यता आहे. आणि ह्या नवीन माऱ्याला तडफदारपणें तोंड देऊं शकतील असे बदल मानवी शरीरांत घडून आले नाहींत तर लोकसंख्येचा आंकडा उताराला लागून मानववंश नष्टहि होऊन जाईल.

### प्रसरणाची वाढती शक्यता

अणुअस्त्रानें हिरोशिमा व नागासाकी येथें घडविलेल्या शहरांच्या नाशाचा आणि मनुष्यसंहाराचा आतांपर्यंत मनुष्य विचार करीत होता. भावी पिढ्यांवर ह्या प्रसरणांचा काय घोर परिणाम घडून येईल हा विचार त्याला सुचलाहि नव्हता. पण हायड्रोजन बॉम्बनें शास्त्रज्ञांना आणि इतर विचारवंतांना एकदम जागे केले आणि ह्या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करूं लागतांच सबंध जगांतील लोकमत अण्वस्त्रांच्या वापराविरुद्धच नव्हे तर त्यांच्या चांचणी परीक्षा घेण्याविरुद्ध उठून उभें राहिलें. लोकमताचा प्रभाव पडून अणुशक्तीचा युद्धकाळांत उपयोग न करायाचे आश्वासन युद्धपिपासु राष्ट्रांकडून मिळालें तर जगांतील माणसें सुटकेचा श्वास टाकतील त्यांत संदेह नाहीं. पण अण्वस्त्रांचा युद्धोपयोगी उपयोग विरला तरी शांततेच्या उत्पादनांत अणुशक्तीचा वापर करण्याकडे असणारा वाढता कल चालूं राहणारच । प्रयोगशाळा, दवाखाने, इस्पितळें येथें किरणोत्सारी समधर्मी अणूंचा आणि क्ष-किरणांचा वाढता उपयोग चालू राहणारच ! त्यामुळें माणसांवर प्रसरणांचे होणारे आघात कमी होण्याची शक्यता आहे काय ? भिन्न भिन्न क्षेत्रांत वापरण्यांत येणारी, अणुशक्तीवर उभारलेलीं साधनें व त्यामुळें उत्पन्न होणारीं प्रसरणें ( Radiations ) ह्या शतकांच्या आंत इतकीं वाढतील कीं अणूंच्या विघटनांतून निर्माण होणाऱ्या स्ट्रान्शीयम ९० ह्या धातूंचे कण वातावरणांत इतके पसरतील कीं त्यांपैकीं १/१०० अंश सबंध पृथ्वीला भारी होऊन जाईल. पुष्कळांना सांगितलें तर खरें वाटणार नाहीं पण आज अणुप्रसरणापेक्षां क्ष-किरणांचा परिणाम गुणमण्यांवर जास्त प्रमाणांत घडत आहे.

तेव्हां आज वैद्यकशास्त्रासमोर ही मोठी समस्या उभी आहे कीं प्रसरणांची किमान मात्रा किती कीं ज्यामुळें त्याचा चालूं अगर भावी पिढ्यांवर परिणाम होणार नाहीं. त्यादृष्टीनें सध्यांची शास्त्रज्ञांची कल्पना ही आहे कीं आठवड्याला 0·3 r एवढा डोस माणसावर आविष्कारीत झाला तर त्याचे परिणाम होणार नाहींत. पण तरीदेखील दूरच्या पिढीवर ह्या मात्रेचे परिणाम निखालसपणें होणारच नाहींत अशी खात्री देववत नाहीं.

### समस्येचें जागतिक स्वरूप

आपल्या देशासमोर देखील हे सर्व प्रश्न आजच्या घटकेला उभे आहेत. अणुशक्तींचीं केंद्रें उभारण्याचें विचार आपले सरकार करीत आहे.










केंद्रस्थ क्रियाशीलांचा ( Nuclear Reaction ) उपयोग आपल्याकडे होणार ही निश्चित गोष्ट आहे. क्ष-किरणाचा वापर तर सर्वत्र चालूं आहेच ! अशा वेळीं किरणोत्सर्गी वर्ज्य ( Radio Active waste ) पदार्थांची विल्हेवाट व्यवस्थितपणें लावली जाईल ही खबरदारी घ्यायला हवी ! क्ष-किरणांचा वापरहि अत्यंत नियोजनपूर्वक होईल असें पाहणें अगत्याचें आहे.

पण समजा एका देशानें ह्या सर्व खबरदाऱ्या घेतल्या आणि त्याच्या शेजारच्या राष्ट्रानें अणुशास्त्राची चांचणी घेण्याचे प्रयत्न केले तर त्याचे परिणाम जवळच्या देशाला भोगावे लागतीलच ! फुटलेल्या अणूंतून जीं किरणोत्सर्गी द्रव्यें बाहेर फेंकली जातात तीं हवेंत उडून पृथ्वीच्या भूभागावर कोठेंतरी स्थिर होतात. हजारों कोस लांबपर्यंत तीं वाऱ्यानें पावसानें वाहून येतात. ह्या द्रव्यांतील स्ट्रॉन्शीयम् धातुकण फार काळपर्यंत किरणोत्सर्गी राहतात. माणसाच्या शरिरांत त्यांचा शिरकाव झाला तर त्यापासून कॅन्सर होतो. बिकनी, मॉन्टीबेलो, सायबेरियापासून हजारों मैल दूर असणाऱ्या कलकत्त्यांतील दुधांत आणि भाज्यांत किरणोत्सर्गी द्रव्यें सांपडल्याचा अनुभव नुकताच आला आहे. ज्या जमीनींत ही भाजी तयार झाली व ज्या जमिनींतला चारा दुभत्या जनावरांनीं खाल्ला त्या जमिनींत किरणोत्सर्गी द्रव्यें मिसळलीं जाणें शक्य होतें.

तेव्हां अणुशक्ति ही एक मोठी समस्या मानवसमाजासमोर उभी राहिली आहे. अणूचे विघटन करण्याचा शोध मानवाच्या बुद्धिशक्तीची आश्चर्यकारक फेंक आहे. मानवाचा सांस्कृतिक इतिहास हा त्याच्या बुद्धिवैभवाचा तेजस्वी आविष्कार आहे; अणूंचे गुपित शोधून काढून मानवानें निसर्गावर मात केली. पण हाच अणु, रोगानें विकृति निर्माण करून अगर मानवी वंशाचे विघटन करून, मानवजात नष्ट करणार काय ? मानवासारखा द्विपाद् प्राणी निर्माण होणें हा एक आश्चर्यकारक अपघात आहे. आणि अणूंच्या साहाय्यानें तसलाच एक अपघात होऊन अखिल मानववंश नष्ट होणार कीं मनुष्य आपल्या बुद्धिवैभवाच्या आणि नैतिक बलाच्या साहाय्यानें अणुशक्तीच्या प्रसरणांना काबूत आणून समाजाच्या हितार्थ वापरण्यांत यशस्वी होणार ? असें आजच्या प्रश्नाचें स्वरूप आहे.

---

## भूदानाचा हेतु :

" मी क्रांति अडवूं इच्छीत नाहीं, तर योग्य मार्गानें क्रांति नेऊं इच्छितों. गांधीजी एका वर्षांत स्वराज्य बोलले होते. त्यांनीं अहिंसेच्या मार्गानेंच लोकांना नेलें, त्यायोगें थोडा वेळ लागला तरी काय झालें ? लोक मला विचारीत असतात, ' रशियांत झटक्यांत काम झालें, चीनमध्येंहि तसेंच झालें, मग इथें कां होत नाहीं ? ' पण ते हें विसरतात कीं, तेथें प्रथम हिंसक क्रांति झाली आणि मागाहून काम झालें. लोक मला म्हणतात कीं, ' तुमच्या चळवळीनें गरीब जनतेंत असंतोष वाढेल आणि तिचा धीर सुटून ती हिंसेला प्रवृत्त होईल. ' मला हिंसा नको. ती थांबविण्याकरितां तर ही माझी चळवळ आहे. पण मला स्मशानशांतीहि नको. माझ्या या चळवळीला जर जोर लागला, तर जमीन न देणाऱ्यांची संख्या पुष्कळ कमी राहील आणि कसल्याहि प्रकारच्या हिंसेची गरज राहणार नाहीं. म्हणून ज्यांना हिंसा नको त्यांनीं या चळवळींत सामील झालें पाहिजे. आज आहे हीच परिस्थिति जे कायम ठेवूं इच्छितात ते हिंसेंतून वांचूं शकणार नाहींत. मला हिंसा नको असली तरी आजची परिस्थितीहि मी सहन करूं शकत नाहीं. "

— विनोबा








प्रा. र. चिं. बडवे

# आंतरराष्ट्रीय विद्यापीठाची आवश्यकता

## दोन महायुद्धाचा परिणाम

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील महायुद्धांनीं युद्धमान राष्ट्रांच्या भौतिक व मानवी संपत्तीचा अतोनात संहार घडवून आणला; इतका कीं त्याची नुसती कल्पनाहि अंगावर शहारे आणणारी ठरावी. दुसऱ्या महायुद्धाचे परिणाम दहा वर्षे उलटून गेल्यानंतहि अजून जगास भोगावे लागत आहेत. परंतु वाईट गोष्टीलाहि कांहींनाकांहीं चांगली बाजू असतेच. निदान युद्धपरिणामांबद्दल तरी तसें निश्चयानें म्हणतां येईल. ती बाजू अशी कीं या अभूतपूर्व संहारामुळें जागतिक लोकमतास आंतरराष्ट्रीयत्वाचें वळण मिळालें. पहिल्या महायुद्धापर्यंतच्या काळांत राजकीय दृष्ट्या राष्ट्रीयत्व म्हणजेच सर्वोच्च व सर्वोत्तम ध्येय होय असें सर्वसाधारणपणें सर्वत्र मानलें जाई. परंतु याच राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें उच्छृंखलपणाच्या आहारीं जाऊन कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत थैमान घालण्यास सुरुवात केली म्हणजे त्यांतूनच महायुद्धांसारखें प्रलय निर्माण होतात; व त्यांत जितांप्रमाणेंच जेत्यांचेंहि अतोनात व सर्वांगीण स्वरूपाचें नुकसान होतें असें जनतेस हळूहळू पटूं लागलें. स्वाभाविकपणेंच या भावनेच्या उपासनेला आंतरराष्ट्रीयत्वाचा अडसर घालण्याची आवश्यकता विचारवंतांना भासूं लागली. येनकेन प्रकारेण आपल्या राष्ट्रांतील जनतेचें किंवा तिच्या एकाद्या गटाचें ऐहिक कल्याण साधलें म्हणजे झालें; मग त्यापायीं इतर राष्ट्रांतील लोकांचें कांहीं का होईना या वृत्तीऐवजीं अखिल मानवजातीच्या हिताशीं अविरोधी असें राजकीय धोरण निरनिराळया राष्ट्रांनीं आखणें अवश्य आहे या विचारसरणीचा पगडा उत्तरोत्तर अधिकाधिक प्रमाणांत जागतिक लोकमतावर बसूं लागला. महायुद्धांच्या परिणामांची ही बाजू अप्रत्यक्ष असली तरी ती प्रत्यक्ष परिणामांच्या काळयाकुट्ट बाजूपेक्षां तुलनेनेंसुद्धां अधिक उज्ज्वल आहे असेंच कोणीहि म्हणेल. कारण तिच्यामुळें राष्ट्रीय विचारसरणींत स्वराष्ट्रीयांबरोबर अखिल मानवजातीच्या भविष्याचाहि अंतरभाव करण्याची संवय लोकांना लागूं लागली आहे. तथापि या संवयीची वाढ गोगलगाईच्या गतीनें होत असल्यानें राष्ट्रीयत्वाचाच पगडा अद्यापीहि जागतिक लोकमतावर प्रामुख्यानें दिसून येतो. शिवाय विचार व कृति यांमध्यें अंतर असतें. यामुळें आंतरराष्ट्रीयत्वाची भावना जरी जागृत होत असली तरी प्रत्यक्ष कृतीच्या वेळीं ती राष्ट्रीयत्वावर मात करण्याइतकी अजून तरी प्रबळ झालेली नाहीं.

## शाश्वत सुरक्षिततेची गरज

गेल्या एकदोन शतकांतील भौतिक शास्त्रांच्या वाढीमुळें मानवाच्या सुखसमृद्धींत जशी क्रान्ति घडून येत आहे तशीच त्याच्या संहारशक्तींतहि तितकीच, किंबहुना अधिकच प्रमाणांत भर पडत आहे. यामुळें शत्रूचा आपण जितक्या त्वरेनें व मोठ्या प्रमाणांत नाश करूं शकूं तितक्या प्रमाणांत आपला विजय होण्याची शक्यता अधिक अशी पक्की खूणगांठ बांधून प्रत्येक राष्ट्रानें, विशेषतः मोठ्या व प्रगत राष्ट्रांनीं, आपापल्या देशांतील शास्त्रज्ञांना जणूं वेठीस धरलें व नवीन संहारास्त्रें उत्पादन करण्याचा सपाटा चालविला. या बाबतींत देशोदेशांत अगदी पराकाष्ठेची स्पर्धा सुरूं झाली व व ती आजतागायत सुरूंच असून पुढेंहि, विशेष कांहींतरी घडल्याशिवाय, संपण्याचीं चिन्हें तूर्त तरी

दिसत नाहींत. या प्रश्नाला इतकें महत्त्व देण्यांत आलेलें दिसतें कीं, त्यामुळें भौतिक शास्त्रवाढीमुळें निष्पन्न होऊं शकणारी सुखसमृद्धि ही सामान्य जनतेच्या आटोक्यांत येणें दूरापास्तच होऊन बसलें आहे. शास्त्रीय ज्ञानवाढीच्या द्वारें जनतेस म्हणजेच बहुजनसमाजास किमान अमुक इतक्या तरी सुखसोयी उपलब्ध करून देणें आपलें कर्तव्य होय, हें सर्वच राष्ट्रांतील सरकारांना पूर्णत्वानें मान्य असलें, तरी तत्पूर्वी आक्रमक परकीयांपासून देश स्वतंत्र व सुरक्षित ठेवण्याची तजवीज करणें हें अधिक महत्त्वाचें कर्तव्य होय; या तत्त्वावर त्यांचे सर्व व्यवहार चालूं असल्यानें संरक्षणात्मक व संहारात्मक शस्त्रांच्या निर्मितीवर सालोसाल कोट्य-वधींनीं खर्च होत असतांहि निकृष्ट स्थितींत कसेंबसें दिवस कंठणाऱ्या सामान्य जनतेची स्थिति सुधारणेचें कार्य आर्थिक टंचाईच्या सबबीवर नेहमींच मागें पडतें, हा अनुभव सर्वच राष्ट्रांच्या बाबतींत अधिक-उण्या प्रमाणांत आढळून येतो. या शस्त्रास्त्रवाढीचा स्वाभाविक परिणाम म्हणजे एकदां युद्ध पेटलें कीं त्याच्या सर्वभक्षी ज्वालांमध्यें घरेंदारें, कारखाने लोहमार्ग, नौकानयन, मुलेंमाणसें इत्यादींचा विध्वंस होणें क्रमप्राप्तच होतें. अण्वस्त्रानें मोठमोठीं शहरें, त्यांतील माणसें संपत्तीसह, क्षणार्धांत बेचिराख होतात हें गेल्या महायुद्धांत सर्वांनीं पाहिलें आहेच. आतां तर विध्वंसनाच्या बाबतींत त्यालाहि बरें म्हणवितील अशी अस्त्रें निर्माण केल्याच्या बढाया सुरूं झालेल्या आहेत. हायड्रोजन बॉंब तर इतका विध्वंसक आहे कीं त्याच्या निर्जन प्रदेशांतील नुसत्या चांचणी स्फोटानेंहि सर्व पृथ्वीवरील मानव-जातीवर संकट कोसळूं पहात आहे; मग त्याचा उपयोग युद्धकालीं करण्यांत आल्यास काय होईल याची कल्पनाच करावी. या अस्त्रांवर व त्यांच्या चांचणीवर बंदी घालण्याच्या वाटाघाटी चालूं असल्याच्या वार्ता मधूनमधून कानांवर येत असल्या तरी युद्ध हा प्रत्येक राष्ट्राच्या जीवनमरणाचा प्रश्न असल्यानें, यदाकदाचित् अशी बंदी घातली गेलीच तरी ती प्रत्यक्ष युद्धांत किती काल अमलांत राहूं शकेल याची शंकाच आहे. बहुधा ती मोडली जाईल व या महाभयंकर अस्त्राचा वापर सर्रास केला जाईल असेंच मानण्याकडे मनाची प्रवृत्ति होते. तसें झाल्यास मनुष्य व इतर प्राण्यांचें भवितव्य काय होईल याची कल्पनासुद्धां करवत नाहीं. भावी परिस्थितीचें हें सर्व चित्र डोळ्यासमोर उभें केल्यावर कोणासहि असे प्रश्न सहजच सुचतील कीं हें सत्र थांबणार केव्हां, मनुष्यजातीला चिरकाल स्वरूपाची सुरक्षितता लाभणार केव्हां व भौतिकशास्त्राच्या प्रगतीचा खराखुरा लाभ तिच्या पदरांत पडणार केव्हां ? कां हें सर्व होण्यापूर्वींच मानवजात नष्ट होणार ? ज्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या सुरक्षिततेच्या नांवावर ही अमानुषता चालली आहे तें स्वातंत्र्य खरोखरच इतक्या मोलाचें आहे काय कीं त्या प्रीत्यर्थ मानवजातीची आहुती देण्यासहि दिक्कत वाटूं नये ? पिकांना धोका उत्पन्न झाला तरी बेहेत्तर पण कुंपण पक्कें झालें पाहिजें अशा पद्धतीची घोडचूक तर यांत होत नाहीं ना ? या व असल्या प्रश्नांच्या उत्तरांचेंच अंतिम पर्यवसान म्हणजे ज्या चक्रनेमिक्रमानें पुन्हां पुन्हां उद्भवणाऱ्या युद्धांत विजय मिळविण्याच्या आशेनें ही अति उत्पातकारी शस्त्रास्त्रें उत्पन्न करण्याचा मोह राष्ट्रांना पडतो त्या युद्धांसच आळा घालणारी एक सार्व-राष्ट्रीय योजना आंखून तिची निग्रहानें अंमल-बजावणी होईल असा बंदोबस्त करणें हें होय. जोंपर्यंत अशी योजना होत नाहीं तोपर्यंत शस्त्रास्त्रां-मागें लागल्याबद्दल राष्ट्रांना, विशेषत: संरक्षणेच्छु राष्ट्रांना, दोष देणें उचित होणार नाहीं. स्वराष्ट्र व स्वजनांच्या हितसंबंधाचें रक्षण करणारी दुसरी यंत्रणा नसेल तर तें कार्य स्वत:च पार पाडणें हें राष्ट्राचें कर्तव्यच होय. मग त्यांत यश येवो अगर








न येवो ! अशी यंत्रणा तयार करण्याचें कार्य मानवी बुद्धीच्या पलीकडचें आहें असें वाटत नाहीं. मुख्य प्रश्न अंमलबजावणीचा आहे. हें काम जागतिक सरकारकडूनच होण्याची शक्यता असल्यानें असें सरकार स्थापन करण्याचा विचार हळूंहळू मूळ धरीत असल्याचें दिसून येतें. अगदीं अलीकडे जगप्रसिद्ध तत्त्वज्ञानी श्री. राधाकृष्णन् व बर्ट्रांड रसेल यांनीं या विचाराला हार्दिक पाठिंबा दिलेला आहे. मात्र असें सरकार स्थापन होणें हें मानवजातींत आंतरराष्ट्रीयत्वाची वाढ होण्यावर अवलंबून असल्यानें चालू युगांतील ही वाढ अतिशय स्वागतार्ह ठरेल यांत शंका नाहीं. अर्थात त्यापासून फलनिष्पत्ति व्हावयाची असेल तर तिची जोपसना पद्धतशीर व अधिक नेटानें होणें आवश्यक आहे इतकें मात्र लक्षांत ठेवावयास हवें; नाहींतर आहे ही वाढ परिणामाच्या दृष्टीनें सध्यां तरी वांझोटी ठरण्याचाच संभव अधिक.

## विज्ञानाच्या विकासाची दुसरी बाजू

युद्धांची भीषणता याच एकमेव कारणामुळें आंतरराष्ट्रीयत्वाची भावना वाढीस लागली आहे असें मात्र नव्हे. भौतिक शास्त्रें दुसऱ्याहि एका मार्गानें तीस खतपाणी घालीत आहेत. हा मार्ग म्हणजे दळणवळणाच्या साधनांत होत असलेली अपूर्व प्रगति हा होय. ही प्रगति सध्यांच परग्रहांवर स्वाऱ्या करण्याची कल्पना दृष्टिपथांत आणण्याइतकी झालेली असून तींत आणखीहि सतत वाढ चालू आहे. वाहनांचा वेग वाढविण्यांत, संहारात्मक शस्त्रांच्या निर्मितीप्रमाणेंच तीव्र स्पर्धा सुरू असून आज पृथ्वीवर विमानवेगाचा विक्रम ताशीं १६८० मैल इतका प्रस्थापित झालेला आहे. हा वेग पृथ्वीच्या दैनंदित गतीपेक्षांहि अधिक असला तरी त्यावर समाधान न मानतां येत्या ५० वर्षांत तो ताशीं २५ हजार मैलांपर्यंत वाढविण्याची उमेद शास्त्रज्ञ बाळगून आहेत. ती साध्य झाल्यावर त्याहीपुढची पायरी असें करीत करीत शास्त्रज्ञ प्रकाश-वेगाची मर्यादा गांठण्याची महत्त्वाकांक्षा मनांत धरतील असें म्हणण्यांत अतिशयोक्तीची फारशी भीति बाळगावयास नको. ही झाली वस्तुवाहनांची स्थिति. संदेशवाहनाबद्दल तर बोलावयासच नको. नभोवाणी व दूरदर्श (Telivision) यांनीं ती मर्यादा केव्हांच गांठलेली आहे. फक्त अतिपरिचयामुळें तिचें महत्त्व आपल्या लक्षांत सहजासहजीं येत नाहीं इतकेंच. या वेगवाढीमुळें 'अंतर' (space) उत्तरोत्तर आकुंचन पावत असून कांहीं बाबतींत तें प्रायः नष्टच झालेलें आहे. भौतिक शास्त्रप्रगतीच्या या दोन बाजूंचा युद्धदृष्ट्या एकत्रित अर्थ असा कीं पृथ्वीवरील कोणत्याहि राष्ट्रास दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रावर केवळ कांहीं तासांच्या अवधींत अतिविध्वंसक स्वरूपाचा हल्ला अगदीं सहज चढवितां येईल. नद्या तर सोडाच, परंतु मोठमोठे पर्वत व महासागर यांचें महत्त्व किंबहुना अस्तित्वहि संरक्षणाच्या अथवा अंतराच्या दृष्टीनें झपाट्यानें नष्ट होत आहे. साहजिकच निरनिराळे देश परस्परांच्या अधिकाधिक निकट येत असून त्यांना अलिप्तवादाचा आश्रय करणें अशक्य होत आहे. परस्परसंबंध एकसारखे वाढत असून त्यांच्या परिणामामुळें आंतरराष्ट्रीयत्वहि वृद्धिंगत होत आहे. अशा रीतीनें भौतिक शास्त्रें दळणवळणसाधनांद्वारें आंतरराष्ट्रीयत्वाला हातभार लावीत आहेत. मात्र यांत एक भानगड आहे. खरें पाहतां अंतर जसजसें आकुंचन पावेल तसतशा राष्ट्राराष्ट्रांतील कडक सीमा आपोआप शिथिल व्हावयास हव्या. परंतु प्रत्यक्षत: मात्र त्या पूर्वींप्रमाणेंच कडक राहिलेल्या दिसतात व त्यामुळेंच परस्परसंशय व संघर्ष टाळणें बहुतांशीं दूरापास्त वाटतें. या अतिमहत्त्वाच्या गोष्टीचा (सीमा नष्ट करण्याचा अगर त्या निदान बऱ्याचशा सैल करण्याचा) जर योग्य वेळींच गंभीरपणें विचार झाला नाहीं तर शास्त्रांच्या प्रगतीमुळें प्राप्त झालेल्या सामर्थ्याच्या










उपयोगानें स्वतःच्या सुखसमृद्धींत भर घालून सुखी होण्यापूर्वींच मनुष्य त्या सामर्थ्याच्या आहारीं जाऊन तद्वारा मानवी संस्कृतीचा किंवा कदाचित् मानव जातीचाच संहार करण्यास प्रवृत्त होईल. हें सांगण्यास भविष्यवादी नको. शास्त्रांची प्रगति ही उत्तरोत्तर भस्मासुरी प्रगतीच्या वळणावर जात असल्याची चिन्हें स्पष्टपणें दिसूं लागलेलीं दिसतात. पूर्वींच्या काळीं भस्मासुरानें ज्याप्रमाणें वरदात्या भगवान् शंकरालाच जाळून टाकण्याचा प्रयत्न केला त्याच-प्रमाणें आधुनिक काळांत भौतिक शास्त्र स्थपित्यालाच (मानवजातीला) भस्म करूं पहात आहेत. जगांतील विचारवंतांना वाटत असलेली ही भीति म्हणजेच आंतरराष्ट्रीयत्वाला मिळत असलेलें खतपाणी होय. या भीतीमुळेंच आंतरराष्ट्रीयत्वाची भावना उत्तरोत्तर विकासत आहे. पहिल्या महायुद्धानंतरचा राष्ट्रसंघ व दुसऱ्यानंतरची संयुक्त राष्ट्रसंघटना (यूनो) ही या भीतीचीच सरकारी पातळीवरील अपत्यें होत. या संघटनांमुळें पृथ्वीवरील शाश्वत शांततेचें ध्येय जरी फारसें जवळ आलेलें नसलें तरी अशा संघटनांची गरज जगाला भासत आहे इतकें तरी त्यावरून निश्चितपणें दिसून येतें व हीच गोष्ट त्यांच्या भावी यशाचें द्योतक म्हणून मानतां येईल. अशा संघटनां-तूनच पुढे मागें 'जागतिक सरकार' या कल्पनेला पोषक अशा घटना घडतील व त्याच्या संस्थापनेचा मार्ग दिसूं लागेल. हें सरकार अस्तित्वांत आलें म्हणजे निरनिराळ्या राष्ट्रांतील सरकारांना प्रान्तीय सरकारचा दर्जा प्राप्त होऊन सैन्याच्या अभावी त्यांना आपापलीं भांडणें जागतिक सरकार अगर आंतरराष्ट्रीय न्यायालय यांच्या मार्फतच मिटवून घ्यावीं लागतील व अशा रीतीनें युद्धांचें एक मोठें व प्रमुख कारण नष्ट झाल्यावर भौतिक शास्त्रांच्या प्रगतिद्वारा मानवी जीवन खरेंखुरें समृद्ध होण्याचा मार्ग मोकळा होईल व कोणी सांगावें, कदाचित पृथ्वीवर नंदानवनच अवतरूं लागेल, पण ......

## राष्ट्रीय सार्वभौमत्वाला मुरड घालण्याची गरज

'जागतिक सरकार' हें ध्येय उपर्युक्त कारणांस्तव मोठें आकर्षक व रम्य भासलें तरी असें सरकार प्रत्यक्ष अस्तित्वांत आणण्याचा व आणल्यावर तें यशस्वी करण्याचा मार्ग अतिशय दुर्गम असून त्यांत अनंत खांचखळगे व कांटेकुटे पसरलेले आहेत. या ठिकाणीं फक्त एकदोन मूलभूत स्वरूपाच्या अडचणीं-चा विचार पुरेसा होईल. आज निरनिराळ्या स्वतंत्र देशांतील राष्ट्रीय सरकारें आपापल्या देशापुरती संपूर्ण सार्वभौम ( Sovereign ) असून निदान तात्त्विक दृष्ट्या तरी त्यांच्यावर कोणत्याहि बाहेरच्या सत्तेला त्यांच्या संमतीविना कोणतीहि गोष्ट लादतां येत नाहीं. यामुळें स्वदेश व स्वजनहितार्थ किरकोळ कायदे पास करण्यापासून प्रसंगीं इतर राष्ट्रांशीं महायुद्धें पुकारण्यापर्यंत कोणतेंहि कृत्य करण्यास तीं आपापल्या-परी स्वतंत्र आहेत. जागतिक सरकार अस्तित्वांत येणें असेल तर राष्ट्रांच्या या हक्काला कांहीं विशिष्ट मर्यादा घालणें अवश्य असल्यानें 'राष्ट्रांचें सार्व-भौमत्व' व 'जागतिक सरकार' या कल्पना संपूर्ण-पणें परस्परविरोधी ठरतात. तथापि सार्वभौमत्वामुळेंच राष्ट्रांना आज आपापल्या भूमीचा स्वतःच्या मगदुरा-प्रमाणें उपयोग करून घेऊन जनतेचें जीवन चालवितां येतें व आपल्या भूमीवर परक्याचें आक्र-मण होण्याचा संभव दिसल्यास प्रतिकारार्थ अवश्य व शक्य ते उपाय योजतां येतात; वाटल्यास युद्धहि पुकारता येतें. सार्वभौमत्व नष्ट झाल्यावर तें या गोष्टी कशा करूं शकणार ? त्यांच्या या मूलभूत हक्काचें काय होणार ? म्हणून सध्यां उपलब्ध असलेल्यापेक्षां अधिक सुरक्षितता व सर्वांगीण उद्धाराच्या मार्गाची निश्चिती पटल्याखेरीज सार्व-भौमत्वाच्या हक्काचा त्याग करण्यास कोणतेंहि राष्ट्र प्रवृत्त होणार नाहीं व त्यानें होऊंहि नये. पण मग प्रश्न असा उद्भवतो कीं अशी निश्चिती अथवा हमी कोण कोणाला देणार व यदा-







कदाचित् कोणी देण्याचा आव आणला तरी त्यावर इतरांचा भरंवसा कसा बसणार ? या प्रश्न-चिन्हामुळेंच जागतिक सरकार स्थापन होण्याच्या मार्गांत अडचणी उत्पन्न होतात. याच मुद्द्याचा थोडा अधिक ऊहापोह केल्यास आपल्या असेंहि सहज लक्षांत येईल कीं जागतिक सरकारच्या संभाव्यतेबद्दल विचार करतांना आपण एका वैचारिक दुष्टचक्रांत सांपडतों. तें दुष्टचक्र असें कीं राष्ट्रांनीं सार्वभौमत्वाचा त्याग केल्याखेरीज जागतिक सरकार अस्तित्वांत येऊं शकत नाहीं व जागतिक सरकार अस्तित्वांत येऊन त्यानें राष्ट्रांना परस्पर सुरक्षिततेची हमी दिल्याखेरीज राष्ट्रें सार्वभौमत्वाचा त्याग करणार नाहींत. या दुष्टचक्राचा यशस्वी रीतीनें भेद करण्यावरच जागतिक सरकारचा पुरस्कार करणाऱ्यांची खरी कसोटी आहे.

## दुसरी अडचण

दुसरीहि एक अडचण अशीच दुर्लंघ्य वाटते. ती ही कीं समजा जागतिक सरकारचें तत्त्व मान्य करून निरनिराळ्या देशांनीं आपापल्या सार्वभौमत्वावर उदक सोडण्याचें कबूल केलें तरी एकदां तें सरकार अस्तित्वांत आल्यावर पुढारलेलीं व बलवान् राष्ट्रें तें काबीज करून त्याचा उपयोग केवळ स्वार्थासाठीं व मागसलेल्या बलहीन राष्ट्रांना निव्वळ गुलामगिरींत ढकलण्यासाठीं करणार नाहींत याची शाश्वती काय ? पूर्वीचा राष्ट्रसंघ व हल्लीची संयुक्तराष्ट्रसंघटना यांच्या प्रत्यक्ष कार्याची पद्धति अभ्यासली तर ही भीति केवळ कपोलकल्पित नसून अगदी वस्तुनिष्ठ आहे हें कोणासहि सहज दिसून येईल. या दोन्ही संघटनांना घटक राष्ट्रांनीं सार्वभौमत्व अर्पण केलें नव्हतें व त्यांपासून राष्ट्र-हितार्थ इष्ट वाटेल तेव्हां अवश्य ती सूचना देऊन फुटून निघण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य त्यांना होतें. अशा स्थितींतहि जर या संघटना म्हणजे चारदोन बड्या राष्ट्रांचीं कारस्थानगृहें बनल्या हें आपण अनुभवतों तर जागतिक सरकारच्या अमदानींत काय होईल ? लहान राष्ट्रें फुटूनहि जाऊं शकणार नाहींत व आंतहि मानानें जगूं शकणार नाहींत. त्यांचा सर्वच बाजूंनीं कोंडमारा होईल, व परिणामीं मोठ्या राष्ट्रांच्या ताटाखालील निव्वळ मांजरें बनण्याचें त्यांच्या नशीबीं येईल. म्हणून प्रश्न असा कीं हे दुष्परिणाम कसें टाळावयाचे ? जागतिक सरकारच्या आमदानींत मोठ्या राष्ट्रांइतकीच लहान राष्ट्रांनाहि सुरक्षितता वाटेल व त्यांच्या सर्वांगीण विकासास पूर्ण वाव मिळेल हें कसें घडवून आणावयाचें ! आदर्श घटना तयार करणें हा एक मार्ग आहे व त्याचा अवलंब केला जाईल हेंहि निश्चित ! परंतु घटनेबाबत अगर कोणत्याहि लिखित कायद्यांबाबत सर्वच ठिकाणचा अनुभव असा आहे कीं ती घटना अगर कायदे कार्यवाहींत आणण्याचें उत्तरदायित्व ज्या व्यक्तींवर अवलंबून असतें त्या व्यक्ती जर त्या घटनांमागील अगर कायद्यामागील हेतूस (Spirit) पारख्या असतील तर घटना अगर कायदे कितीहि उत्तम वा परिपूर्ण असले तरी त्यांचा दुरुपयोग सहज होऊं शकतो अथवा हेतुतः केला जातो. म्हणून दुसरा प्रश्न असा कीं असले दुरुपयोग टाळून जागतिक सरकारची घटना अगर कायदे, त्या मागील हेतू लक्षांत घेऊन व योग्य मार्गानें कार्यवाहींत आणूं शकणारीं माणसें कोठून आणावयाची ? हीं माणसें मुत्सद्दी व कार्यक्षम तर हवींतच परंतु त्याचबरोबर वंशवाद, राष्ट्रवाद, वर्णवाद इत्यादि विभागात्मक व संकुचित भावनांवर मात करून अखिल मानवजातीच्या हिताच्या दृष्टीनें विचार करणारी हवींत. हें साधण्यासाठीं एकादी आंतरराष्ट्रीय योजना करणें शक्य होईल काय ? या प्रश्नाच्या उत्तरावर जागतिक शांततेचें भवितव्य बऱ्याच अंशीं अवलंबून आहे.

## अडचणींचें स्वरूप

वर उल्लेखिलेल्या अडचणी दुर्लंघ्य तर खऱ्याच पण शास्त्रीय दृष्टि लक्षांत घेऊन योग्य मार्गानें








योजनापूर्वक प्रयत्न केल्यास त्या अनुल्लंघनीय आहेत असें मात्र वाटत नाहीं. दुसऱ्या अडचणींतून मार्ग जसजसा निघत जाईल तसतशी पहिली अडचण कमी होत जाईल, तिच्यांतील जोर कमी होत जाईल असा हा कार्यकारणसंबंध आहे. म्हणजे असें कीं संकुचित वादांच्या पलिकडे जाऊन 'वसुधैव कुटुंबकम्' ही वृत्ति अंगांत मुरलेल्या व्यक्तींची संख्या जगांत जसजशी वाढत जाईल तसतसें 'जागतिक सरकार'चें स्वप्न साकार होण्याचा मार्ग मोकळा होऊं लागेल. म्हणून आपला मुख्य प्रश्न म्हणजे जगांतील बुद्धिमान् वर्गावर आंतरराष्ट्रीयत्वाचें संस्कार कसें घडवून आणावयाचें हाच होय.

## शिक्षणाचें महत्त्व

या प्रश्नाचें एकाच शब्दांत उत्तर द्यावयाचें झाल्यास तें 'शिक्षणद्वारें' या शब्दानें अगदी विश्वासपूर्वक देतां येईल. मानसशास्त्र असें सांगतें कीं प्रत्येक व्यक्ति जन्माला येतांना आपल्याबरोबर स्वतःच्या अशा कांहीं प्रेरणा, प्रवृत्ति अगर कल (aptitudes & Potentialities) घेऊन येते; या सर्व शक्ती सुरुवातीला सुप्तावस्थेंत असतात व व्यक्तीच्या वाढीबरोबर त्याहि विकास पावूं लागतात. मात्र कोणत्याहि मनुष्याच्या अमूक अमूक वागणुकींचा पूर्ण उलगडा निव्वळ या सहजप्रवृत्ति अगर प्रेरणांच्या अभ्यासानें होऊं शकत नाहीं. याचें कारण असें कीं, मनुष्याचें व्यक्तिमत्व घडविण्यांत या प्रवृत्तींइतकाच, त्याच्यावर होणाऱ्या संस्कार व सामाजिक परिणांमाचेंहि महत्त्वाचें अंग असतें. हा परिणाम कित्येक वेळां एवढा प्रबळ असतो कीं त्यायोगें मूलप्रवृत्ति फार मोठ्या प्रमाणांत वांकविल्या जातात अगर काबूत आणतां येतात. त्यांना विशिष्ट वळण लावतां येतें अगर कांहीं वेळां तर त्या नष्टप्रायहि करतां येतात. हीच गोष्ट व्यक्तीच्या जगाकडे पाहण्याच्या दृष्टिकोनाबद्दलहि सांगतां येईल. तिच्यावर होणारे सामाजिक व शैक्षणिक संस्कार कोणत्या स्वरूपाचें व प्रकारचे होते व आहेत यावर हा दृष्टिकोन बहुतांशीं अवलंबून असतो. 'जन्मनः जायते शूद्रः संस्काराद्विज उच्यते' । हें स्मृतिकारांचें वचन शब्दशः व अर्थशः संपूर्ण सत्य होय. म्हणून कोणत्याहि परिस्थितींत अमुक एक व्यक्ति कसें वागेल हें समजावून घ्यावयाचें असल्यास त्या व्यक्तीचें या जगांतील अनुभव व तिच्यावर झालेले सामाजिक व शैक्षणिक संस्कार हें विचारांत घ्यावेंच लागतात. उलटपक्षीं असेंहि म्हणतां येईल कीं जर तरुण पिढीचा जगांतील घडामोडींकडे पाहण्याचा दृष्टिकोन अमुक प्रकारचा असणें अवश्य आहे असें वाटत असेल तर तो दृष्टिकोन जेणें करून वाढीस लागेल अशा प्रकारचें सामाजिक व शैक्षणिक संस्कार त्या पिढीवर होतील अशी व्यवस्था करावयास हवी.

## आंतरराष्ट्रीयत्वाचे संस्कार व शिक्षण

राष्ट्रीयत्व व आंतरराष्ट्रीयत्व या निवळ भावना असून त्यांपैकीं कोणत्या भावनेला मनुष्य जवळ करतो हें त्याच्यावर झालेल्या संस्कारावर व तज्जनित दृष्टिकोनावर अवलंबून आहे. जगांतील एकंदरीनें अस्थिर व अनिश्चित स्वरूपाची राजकीय परिस्थिति व कित्येक देशांतील राज्यकर्त्यांमध्यें सुप्तस्वरूपांत अस्तित्वांत असलेली आक्रमक वृत्ति ही लक्षांत घेतां आपापल्या राष्ट्राच्या सुरक्षिततेसाठीं रहिवाश्यांच्या मनांत जाज्वल्य राष्ट्रभक्तीचे संस्कार घडवून आणण्याचे प्रयत्न त्या त्या राष्ट्राच्या सरकारनें करावे हें स्वाभाविकच होय. मात्र यावरून हेंच निष्पन्न होतें कीं राष्ट्रभक्ति हा या संस्काराचा परिपाक असून ते (संस्कार) जर झालें नसते तर राष्ट्रभक्ति ही उत्पन्न झाली नसती. आतां प्रश्न एवढाच कीं जर या धरणीमातेच्या ज्या विभागांत आपण केवळ योगायोगानें जन्माला आलों त्या विभागावर अतोनात स्वरूपाची निष्ठा जनतेच्या मनांत सजविण्याचें कार्य पद्धतशीर शिक्षणरूपीं संस्कारानें साध्य होऊं शकतें तर संबंध










घरणीमातेबद्दलच निष्ठा वा प्रेम रुजविणें कां साध्य होऊं नये ? नवीन पिढीपुढें आपण शिक्षणद्वारें जीवनविषयक कोणता आदर्श उभा करूं यावरच सर्व अवलंबून आहे. एक भावना जितक्या सहजपणें जोपासतां येते तितक्याच सहजपणें दुसरीहि जोपासतां येईल; कारण इतकेंच कीं या दोन्ही भावना निसर्गनिर्मित ( innate ) नसून मनुष्यनिर्मित ( acquired ) आहेत, व त्यांपैकीं कोणती भावना उत्तेजित करावयाची हें सर्वस्वी नसलें तरी बहुतांशीं मनुष्याच्या हातीं आहे. म्हणून राष्ट्रीयत्वाच्या भावनेनें उच्छृंखलपणाच्या आहारीं न जातां आपलें स्थान आंतरराष्ट्रीयत्वाहून गौण आहे असें पक्कें समजून त्यानुसार व्यवहार करण्याची कोशीस केली पाहिजे, असें जर आपणांस खरोखर वाटत असेल तर आपल्या शिक्षणपद्धतींत इष्ट तो बदल घडवून आणण्यानेंच ती गोष्ट साध्य करावयास हवी. ही भावना एकदां बुद्धिवान् वर्गांत रुजून वाढूं लागली म्हणजे जागतिक सरकारचें कामकाज यशस्वी पद्धतीनें चालवूं शकणारी उच्च व्यापक विचारांची विश्वासार्ह माणसें उपलब्ध होऊं शकतील. कदाचित् कोणी असें म्हणतील कीं जागतिक सरकार अद्याप दृष्टीच्या टप्प्यांतहि आलेलें नसतांना हा एवढा खटाटोप कशासाठीं करावयाचा ? याचें उत्तर हें कीं आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन आजपासून वाढीस लावण्याचे प्रयत्न चालूं केले तर जागतिक सरकारचें ध्येय लवकर दृष्टिपथांत आणण्याचें श्रेय मिळेल व शिवाय तावडतोबीचा फायदा असा कीं यूनो जी आज निरनिराळ्या क्षेत्रांत व जगांतील निरनिराळ्या भागांत कार्य करीत आहे तिला अवश्य त्या दृष्टिकोनांचीं माणसें उपलब्ध होतील. कोणाला अशीहि शंका येण्याचा संभव आहे कीं आंतरराष्ट्रीयत्वाच्या भावनेनें जगांत मूळ धरलेलें आहे असें वर म्हटलें असतां आतां या विशेष प्रयत्नांची आवश्यकता काय ? तर त्याला उत्तर असें कीं भौतिक शास्त्रवाढीमुळें मनुष्यजातीवर कोसळूं पाहणारे संकट आपला मार्ग अतिशय त्वरेनें आक्रमीत असतां आंतरराष्ट्रीयत्वाची वाढ मात्र केवळ गोगलगाईच्या गतीनें होत आहे. यामुळें संकटाला तोंड देण्याचें आपलें जें साधन त्याला प्रयत्नपूर्वक धार आणली पाहिजे नाहींतर तें साधन आपल्या उपयोगीं पडण्याइतकें प्रभावी होण्यापूर्वींच कदाचित् मानवजात नष्ट होण्याचा संभव आहे. या सर्व विवेचनांवरून जागतिक सरकारचा मार्ग निष्कंटक करून युद्धांस कायमचा आळा घालण्याच्या कामीं व मानवजातीच्या पृथ्वीवरील भवितव्यतेच्या दृष्टीनेंहि योग्य त्या शिक्षणाचें महत्त्व किती आहे हें कोणाच्याहि लक्षांत येऊं शकेल.

### प्रयोग यूनोमार्फतच हवा

आंतरराष्ट्रीयत्वाची भावना रहिवाश्यांच्या मनांत पद्धतशीर शिक्षणद्वारें पेरण्याचा हा उद्योग मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्यासारखाच होय असा आक्षेप सकृतदर्शनींच उत्पन्न होण्याचा संभव आहे. प्रत्येक राष्ट्र वरील योजनेचें तत्त्व मान्य करील व त्यास अगदी खळखळ न करतां आपली संमतीहि देईल; परंतु ती कार्यवाहींत आणण्याचें मात्र कटाक्षानें टाळील. कारण उघडच आहे. सर्वच राष्ट्रांनीं एकसमयावच्छेदेकरून योजना अमलांत न आणली तर न आणणाऱ्या राष्ट्रांत राष्ट्रीयत्व वाढीस लागून आंतरराष्ट्रीयत्वाच्या मागें लागणाऱ्या राष्ट्राचें मात्र मरण ओढवेल. साहजिकच दुसऱ्या राष्ट्रांकडून ही योजना कृतींत उतरविली जाण्याची वाट प्रत्येक राष्ट्र पाहील व परिणामीं खरीखुरी सुरुवात कोठेंच होणार नाहीं. राष्ट्राराष्ट्रांतील सध्याचे संशय, मत्सर व द्वेष यावर आधारलेले संबंध लक्षांत घेतां या आक्षेपांत बरेंच तथ्य आहे हें मान्य करावयास हवें. त्याच्या निराकरणाचा एकमेव उपाय म्हणजे अवश्य तीं साधनें उपलब्ध असलेल्या जागतिक संघटनेनें हा प्रश्न हातीं घेणें हा होय. यूनो खेरीज अशी दुसरी संघटना कोठें आहे ?

## कार्याची दिशा : स्वतंत्र विद्यापीठ

शिक्षणपद्धतींत अवश्य तो बदल योजनापूर्वक घडवून आणल्यास आंतरराष्ट्रीयत्वाची भावना वाढीस लागेल व या कार्यास यूनोकडूनच चालना मिळणें अवश्य आहे हें तत्त्व एकदां मान्य केलें म्हणजे पुढील समस्या अशी कीं हा बदल कसा व कोठें व कोणत्या क्रमानें कार्यान्वित करावयाचा. तेव्हां आतां तिच्याकडे वळूं. जग हें इतकें अवाढव्य आहे कीं सर्वच देशांतील संपूर्ण शिक्षण-पद्धतीवर विशिष्ट प्रकारचें नियंत्रण ठेवून ती अमुक बाबतींत एकसांची बनविणें सर्वथा अव्यवहार्य होय. पण आपल्या साध्यासाठीं इतक्या प्रचंड खटाटोपाची मुळीं गरजच नाहीं. प्राथमिक शाळेंत दाखल होणारे विद्यार्थी हे आपलें व सभोंवतालचीं कुटुंबें यांच्या वर्तुळांतून बाहेर पडून समवयस्कांच्या सहवासांत मोठ्या प्रमाणावर प्रथमच येतात. यामुळें त्यांची दृष्टि छोट्या कौटुंबिक विचारसरणींतून बाहेर पडून व्यापक होऊं लागते. त्यांचे विचार घरापुरतेंच मर्यादित न राहतां आपलें खेडें वा शहर व्यापू लागतात. हेंच विद्यार्थी पुढें उच्च, प्राथमिक अगर माध्यमिक शाळेंत जाऊं लागले म्हणजे त्यांची दृष्टि अधिकच व्यापक बनून ते आपल्या राष्ट्राबद्दल विचार करूं लागतात व कालमानानुसार इतर राष्ट्रें व त्यांतील जनता हींहि त्यांच्या विचारकक्षेंत येऊं लागतात. येथपर्यंत आल्यानंतर शिक्षणाची पुढील पायरी म्हणजेच विद्यापीठीय शिक्षण ही होय. साहजीकच त्यांच्या विचारांना आंतरराष्ट्रीयत्वाचें वळण लावण्यास उच्च शिक्षणाचें क्षेत्र हेंच योग्य होय. म्हणून यूनोनें प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मुख्यतः निरनिराळ्या राष्ट्रांच्या सद्बुद्धीवर सोंपवून आपलें कार्य उच्च शिक्षणावर केंद्रित करणेंच योग्य ठरेल. परंतु याहि बाबतींत कांहीं मूलभूत स्वरूपाच्या अडचणी उत्पन्न होण्याचा संभव आहे. एक म्हणजे जगांतील विद्यापीठांची प्रचंड संख्या व विद्यापीठांच्या अंतर्गत स्वायत्ततेचें सर्वमान्य तत्त्व हीं लक्षांत घेतां यूनोला या सर्व किंवा बहुसंख्य विद्यापीठांवर आपल्या ध्येयानुरूप नियंत्रण ठेवणें बहुधा कठीणच होणार. तिला फारतर शिफारसवजा कांहीं सूचना करतां येतील. दुसरी अडचण अशी कीं शिक्षण हा प्रत्येक सभासदराष्ट्राचा अंतर्गत प्रश्न आहे अशा समजुतीवर यूनोचे या बाबतींतील व्यवहार चालूं असल्यानें तिनें केलेल्या सूचना कार्यवाहींत आणणें हें सर्वस्वीं राष्ट्रें व विद्यापीठें यांच्या केवळ मर्जीवर अवलंबून राहील. तात्पर्य असें कीं निरनिराळ्या देशांतील विद्यापीठीय शिक्षणांत आपल्याला हवे असलेले विशेष प्रकारचे बदल घडवून आणणें यूनोला सद्यःस्थितींत शक्य होणार नाहीं. परंतु याबद्दल विद्यापीठांना दोष देणें मात्र अविचाराचें होईल. सध्याचीं विद्यापीठें या मुख्यतः राष्ट्रीय संस्था असल्यानें आपापल्या राष्ट्रांच्या विविध गरजा व परिस्थिति लक्षांत घेऊन शैक्षणिक धोरण आखणें व राष्ट्राराष्ट्रांत संघर्ष होण्याचें भय कायम असेंपर्यंत आपापल्या विद्यार्थ्यांमध्यें राष्ट्रीयत्वाची भावना जोपासण्यास हातभार लावणें हें त्यांचें प्रमुख कर्तव्यच आहे, हें कोणासहि नाकारतां येणार नाहीं. या आपत्तींतून बाहेर पडण्याचा एकमेव मार्ग म्हणजे यूनोनें स्वतःचेंच एक विद्यापीठ स्थापून आंतरराष्ट्रीयत्वाला हेतूपूर्वक व पद्धतशीर रीतीनें चालना देणें हाच दिसतो. या मार्गानें गेल्यास जागतिक सरकारच्या प्रतिष्ठापनेसाठीं अवश्य ती आंतरराष्ट्रीयत्वाची वृत्ति जगांतील बुद्धिवान् वर्गांत प्रत्यक्ष कृतीनें वाढीस लावण्याचें श्रेय तर यूनोला मिळेलच. शिवाय सर्वत्र पसरलेल्या प्रादेशिक व उपप्रादेशिक विद्यापीठांपुढें आदर्श शिक्षणपद्धति ठेवून अप्रत्यक्षपणें त्यांच्या दृष्टिकोनांतहि कालान्तरानें यूनोच्या ध्येयास पोषक असा बदल घडवून आणतां येईल.








## विद्यापीठाचीं मूलभूत तत्त्वें

युद्धाचें मूळ नष्ट करण्याचें एक परिणामकारक साधन म्हणून शिक्षणाचा उपयोग करण्याची कल्पना बरीच जुनी असून तिचा सर्व इतिहास मननीय आहे. परंतु तो एका स्वतंत्र लेखाचा विषय असल्यानें त्याचा प्रपंच येथें नको. चालू काळच्या दृष्टीनें इतकें लक्षांत घेतलें म्हणजे पुरे कीं सरकारी पातळी-वरील जागतिक संघटना जी यूनो तिच्या लक्षांत स्व का र्य सि द्धि प्री त्य र्थ शिक्षणाचें महत्त्व पूर्णपणें आलेलें असून तिनें युनेस्कोमार्फत यावत्‌शक्य प्रयत्न चालविले आहेत. मात्र साध्याच्या दृष्टीनें ते प्रयत्न अगदीं तोटके पडत असून आंतरराष्ट्रीय विद्यापीठा-सारखी एकादी संस्था कार्यान्वित केल्याखेरीज त्या प्रयत्नांना म्हणण्यासारखें यश लाभण्याची शक्यता वेतावाताचीच आहे. म्हणून यूनोनें आतां या प्रश्नाकडे तांतडीनें लक्ष पुरवावें असें वाटतें. सध्याचा काळ यासाठीं पुष्कळसा अनुकूल असल्यानें या संधीचा फायदा सहज घेतां येईल. असें करतांना केवळ सनदी नोकर तयार करण्याचें एक साधन हा संकुचित हेतू समोर न ठेवतां जगांतील बुद्धिमान् वर्गांत आंतरराष्ट्रीयत्व वाढविण्याचा व्यापक हेतू समोर ठेवावा इतकें मात्र नीट लक्षांत ठेवण्याची दक्षता घ्यावयास हवी. यासाठीं कांहीं मूलभूत तत्त्वें प्रथमपासून नजरेसमोर ठेवणें अवश्य असल्यानें त्यांपैकीं महत्त्वाच्या तत्त्वांचा त्रोटक उल्लेख पुढें केला आहे.

( १ ) हें विद्यापीठ सर्वस्वी यूनोच्या अधिपत्या-खालीं ठेवून त्याच्या खर्चाची सर्व जबाबदारी यूनोनें पत्करावी.

( २ ) सर्व महाविद्यालयांना घटक - महाविद्या-लयाचा दर्जा असावा. अर्थातच विद्यापीठ प्रत्यक्ष अध्यापनकार्य करणारें असावें.

( ३ ) केव्हांहि युद्धपरिस्थिति उत्पन्न झाल्यास, रेडक्रॉस सोसयटीप्रमाणें विद्यापीठासहि आंतरराष्ट्रीय कायद्यान्वयें संपूर्ण संरक्षण मिळावें.

( ४ ) आपापल्या क्षेत्रांतील सनदी नोकरवर्ग निवडण्याच्या कामीं राष्ट्रांतर्गत विद्यापीठांप्रमाणेंच या विद्यापीठाच्या पदव्यांना यूनोच्या सभासदराष्ट्रांनीं मान्यता द्यावी; व यूनोनें आपल्या क्षेत्रांतील नोकरवर्गाची भरती करतांना या विद्यापीठांतील पदवीधरांना विशेष पसंति द्यावी. हें करतांना कार्यक्षमतेस बाध येणार नाहीं इतकें यूनो अर्थातच पाहील.

( ५ ) बौद्धिक व इतर पातळीच्या किमान म्हणून निश्चित केलेल्या दर्ज्यास बाध येणार नाहीं इतकें अवधान ठेवून दरेक राष्ट्रांतून त्याच्या लोक-संख्येच्या प्रमाणांत बसतील येवढ्या विद्यार्थ्यांना विद्यापीठांत प्रवेश देण्यांत यावा; व असें विद्यार्थी निवडण्याचें कार्य यूनोनें आपल्या अधिकाऱ्यांमार्फत करावें. विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांकडेहि हें काम सोपविण्यास हरकत नाहीं.

( ६ ) इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन, हिंदी व चिनी या सहा भाषा शिक्षणाचें माध्यम म्हणून स्वीकाराव्या ( यांत आणखी एकाद दुसऱ्या भाषेचा समावेश परिस्थितीनुरूप करण्यास हरकत नाहीं ). या योगें जगांतील सुमारें दोन तृतियांश लोक-संख्येची सुरुवातीपासूनच सोय होईल.

( ७ ) विद्यापीठांत प्रवेश घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याचें या सहा सात भाषांपैकीं किमान दोन भाषांवर तरी संपूर्ण प्रभुत्व हवें. तीनवर असल्यास अर्थात फारच उत्तम. या भाषांतून परीक्षेंतील प्रश्नांचीं उत्तरें लिहिण्याइतकी व सफाईदार बोलण्या-इतकी पात्रता त्यांच्या ठिकाणीं हवी.

( ८ ) निरनिराळ्या विषयांसाठीं प्राध्यापकांची निवड करतांना प्रत्येक विषय वरील प्रत्येक भाषेंत शिकविण्याची सोय होईल असें धोरण काटेकोरपणें आखावें.

( ९ ) घटक महाविद्यालयें निरनिराळ्या राष्ट्रांत उघडावींत. त्यांची संख्या सुरुवातीस सुमारें










पंचवीस असावी. म्हणजे प्रत्येकीं १० कोटी लोकसंख्येसाठीं एक महाविद्यालय असें प्रमाण पडेल. मागणी व परिस्थितीप्रमाणें विद्यालयांच्या संख्येंत वाढ घडवून आणण्याची सोय असावी हें सांगणें न लगे. महाविद्यालयें कोठें असावींत हें निश्चित करण्यासाठीं म्हणूनच केवळ जगाचें सोयिस्कर असें विभाग पाडण्यांत यावें. म्हणजे विद्यालयें सर्व राष्ट्रांत प्रमाणशीरपणें विखुरलीं जातील व कोणत्याहि एका प्रदेशांत, खंडांत वा देशांत त्यांची गर्दी होणार नाहीं.

( १० ) विद्यापीठांतील शिक्षणक्रम पांच अथवा सहा वर्षांचा असावा. व या मुदतींत तीन निरनिराळया राष्ट्रांतील विद्यापीठांच्या महाविद्यालयांत शिक्षणासाठीं जाणें प्रत्येक विद्यार्थ्यास अवश्य असावें. विद्यार्थी ज्या ज्या देशांत जातील त्या त्या देशाच्या कांहीं विशिष्ट सांस्कृतिक अंगांचा संपूर्णपणें अभ्यास करून तद्विषयक स्वतंत्र संशोधनात्मक प्रबंध तयार करण्याचें बंधन त्यांच्यावर असावें. या योगें विद्यार्थ्यांचा तद्देशीयांशी घनिष्ट संबंध येईल व विद्यापीठाजवळ जगांतील निरनिराळया संस्कृतीच्या अंगोपांगांची माहिती जमा होईल.

( ११ ) विद्यापीठीय शिक्षणासाठीं विद्यार्थ्यांकडून शुल्क घेण्यास हरकत नाहीं. परंतु यांत विद्यापीठ आर्थिक दृष्टया स्वयंपूर्ण करण्याचा हेतू मात्र असूं नये. जगांतील विशेष बुद्धिमान् व सर्वांगीण दृष्टया सत्पात्र व पुढारी होण्यास योग्य असें विद्यार्थी निवडून काढून त्यांच्यावर पद्धतशीर शिक्षणद्वारें जागतिक शान्तीस अत्यावश्यक असें संस्कार घडविणें हा मुख्य हेतू असावा. अर्थांतच सर्व दृष्टींनीं योग्य अशा विद्यार्थ्यास प्रवेश मिळण्यास आर्थिक कारणास्तव कधींहि अडचण उत्पन्न होऊं नये. शक्य तर शुल्काची रक्कम ही विद्यार्थ्यांच्या आर्थिक परिस्थितीवर अवलंबित असावी.

( १२ ) विद्यापीठाचा योगक्षेम व्यवस्थित चालविण्यासाठीं अवश्य असणारें द्रव्य सभासदराष्ट्रांवर उत्पन्नाची अगर लष्करी खर्चाशीं प्रमाणशीर कर बसवून मिळविण्यांत यावें. याचा मोबदला म्हणजे त्या त्या राष्ट्रांतील कांहीं विद्यार्थ्यांना शिक्षण मिळेल हा होय.

१३ प्रत्येक घटक-महाविद्यालय हें आसमंतांतील परिस्थितिनुरूप एक अगर दोन विषयांच्या खास व सर्वांगीण अभ्यासाचें केंद्र बनवून त्या त्या विषयांचा विशेष अभ्यास करणाऱ्या सर्व राष्ट्रांतील विद्यार्थ्यास तेथें पाठविण्यांत यावें. या योगें अनेक राष्ट्रांतील विद्यार्थी विशिष्ट कालपर्यंत एकत्र राहतील. आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन घडविण्याच्या कामीं याचा किती उपयोग होईल हें मुद्दाम विशद करण्याची आवश्यकता नाहीं.

( १४ ) आंतरराष्ट्रीय कायदा, आध्यात्मिक मूल्यें व मूलभूत स्वरूपाचीं सामाजिक शास्त्रें यांचा अभ्यास सर्व विद्यार्थ्यांस अवश्य असावा. इतर विषय शिकवितांनाहि ते ज्या दृष्टिकोनांतून शिकविले जातात त्याला विशेष महत्त्व आहे ही गोष्ट सतत लक्षांत बाळगण्याबद्दल प्राध्यापकांना कायमच्या सूचना देण्यांत याव्या. सर्वच महाविद्यालयांतील शैक्षणिक वातावरण असें असावें कीं शिक्षणक्रम पुरा करून विद्यापीठ सोडणारे विद्यार्थी आंतरराष्ट्रीयत्वाचा संदेश घेऊन बाहेर पडतील व उदरनिर्वाहार्थ त्यांनीं कोणताहि व्यवसाय कोठेंहि पत्करला तरी आपल्या सवडीचा महत्त्वाचा भाग आत्यंतिक स्वरूपाच्या राष्ट्रीयत्वाला लगाम घालण्यासाठीं खर्च करतील अशी आंतरिक तळमळ त्यांना लागून रहावी.

मूलभूत तत्त्वांची यादी आणखी वाढविण्याची आवश्यकता नाहीं. इतकें सांगितलें कीं पुरें कीं विद्यापीठाचें सर्व नियम, वातावरण, शिक्षणक्रम व विद्यार्थ्यांचे दैनंदिन जीवन अशा प्रकारें आंखण्यांत








यावें कीं तें विद्यापीठ शब्दशः, अर्थशः व कृतिशः निर्भेळ आंतरराष्ट्रीय शिक्षणकेंद्र बनावें, व त्यायोगें आंतरराष्ट्रीय समजूत निश्चित स्वरूपांत वाढीस लागावी. यूनोचे चालक या दृष्टीनें मनापासून व कळकळीनें हालचाल करतील अशी आशा आहे.

यूनोबाहेरील निरनिराळ्या विशेषतः राजकीय, शैक्षणिक व सांस्कृतिक क्षेत्रांत कार्य करणाऱ्या लोकाग्रणींवरहि कांहीं जबाबदारी पडते. मानवजातीवर ओढवू घातलेल्या संकटाची चाहूल त्यांनाहि लागलेली असणारच. तेव्हां त्यांनीं 'मला काय त्याचें' या वृत्तीचा त्याग करून संघटितपणें यूनोवर दाब आणण्यासाठीं अवश्य ते प्रयत्न केले तर यूनोलाहि हालचाल करण्यास उत्तेजन मिळेल. अशा बाबतींत व्यक्तिगत प्रयत्न सुफल होण्याची शक्यता फारच थोडी असते. नोव्हेंबर १९५६ मध्यें दिल्लीस भरलेल्या युनेस्कोच्या साधारणसभेच्या कार्यक्रमपत्रिकेवर हा विषय यावा व त्यासाठीं भारतसरकारनें आपलें वजन खर्च करावें अशी सूचना मी शिक्षणखात्यास केली होती; परंतु तिचा फारसा उपयोग झाला नाहीं, असें वर्तमानपत्रातील प्रतिवृत्तांवरून वाटतें. म्हणून दिल्ली अगर मुंबईसारख्या प्रसिद्ध शहरीं International University Establishment Association अशा नांवाची एकादी वजनदार संस्था स्थापन होऊन तिच्यामार्फत प्रयत्न झाल्यास हा प्रश्न सुटण्याच्या दृष्टीनें पहिलें पाऊल टाकल्यासारखें होईल. तरी या दिशेनें विचार व्हावा असें वाटतें.[1]

---

## संपत्तिदानाबाबतचा दृष्टिकोण :

" संपत्तिदानांतून एक गोष्ट आम्हांला दाखवायची आहे. ती ही कीं, अपरिग्रह ही सामाजिक हिताकरितां उपयोगी पडणारी शक्ति आहे. अपरिग्रहानें व्यक्तीची आत्मशुद्धि होते, हें पूर्वीपासून आपल्याला माहीत आहे. परंतु समाजाच्या कल्याणाचे प्रभावी साधन म्हणूनहि तो उपयोगी पडतो. आध्यात्मिक उन्नतीकरितां तो उपकारक आहे एवढेंच नव्हे तर, ऐहिक जीवनसुद्धां उन्नत आणि संपन्न करण्याला त्याची मदत होऊं शकते. गांधीस्मारक-निधीनें १० कोटी रुपये जमविले. पण गरज इतकी मोठी आहे कीं, १०० कोटी रुपयेसुद्धां पुरणार नाहींत. या काळाची ही गरज आहे कीं ज्या कोणत्या स्वरूपांत आपली संपत्ति असेल ती सगळी समाजाच्या कामीं उपयोगांत आणली गेली पाहिजे. संपत्तिदानानें प्रत्येक घर ही एक बँकच होईल. या बँकेंतून लागेल त्या वेळीं समाजाला लागेल तेवढी रक्कम काढतां येईल. संपत्ति जेथें मिळाली तेथेंच तिचा विनियोग करावयाचा असल्यामुळें ही योजना सहज अंमलांत येऊं शकेल. लोकांचें सामुदायिक बळ यांतून निर्माण होईल. एकमेकांशीं ते बांधले जातील आणि समाजरचनेच्या कामासाठीं प्रचंड शक्ति यांतून मिळेल... "

" वाममार्गानें पैसे न मिळविण्याचें बंधनहि संपत्तिदात्यावर राहील. मी सहावा हिस्सा मागतों याचा अर्थ उरलेल्या पांचषष्ठांश संग्रहाला माझी मान्यता आहे असा नाहीं. ज्यानें समाजाला एकषष्ठांश मिळकत निरंतर अर्पण करण्याचा नियम एक जीवननिष्ठा म्हणून मान्य केला त्यानें आपली सारी संपत्ति, सारें जीवन, एवढेंच नव्हे तर आपला जीवननिर्वाह देखील समाजाला अर्पण करण्यासाठीं कंबर कसली. संपत्तिदान-यज्ञाकडे मी या दृष्टीनें पाहतों. "

-- विनोबा

1 'Indian Council of World Affairs', New Delhi या संस्थेच्या 'India Quarterly' या त्रैमासिकाच्या जुलै-सप्टेंबर १९५३ च्या अंकांतील प्रस्तुत लेखकाच्या 'Need of an International University' या लेखाच्या महत्त्वाच्या भागाचा स्वैर अनुवाद.










प्रा. म. गो. भाटे

# सिग्मंड फ्रॉइड व इंग्रजी वाङ्मय

## प्रस्थापित विचारसरणीला धक्का

मनोविश्लेषणशास्त्राचा निर्माता व मानसशास्त्रांत महत्त्वाची भर घालणारा शास्त्रज्ञ सिग्मंड फ्रॉइड ह्याची जन्मशताब्दि यंदा साजरी झाली. मानसशास्त्रीय विचारांत क्रांति घडवून आणणारे फ्रॉइडचे सिद्धांत प्रसिद्ध झाल्याला अर्धशतकाहून अधिक काळ लोटला आहे. १९०० सालीं त्यानें **स्वप्नांचें विशदीकरण** (Interpretation of Dreams) हा ग्रंथ प्रसिद्ध केला व तेव्हांपासून १९४६ सालापर्यंत त्याची ग्रंथनिर्मिति अव्याहत चालूं होती. मानवी मनोव्यापारांच्या शास्त्रीय अभ्यासांत फ्रॉइडपूर्वीच्या काळांत मनाच्या बुद्धिपुरस्सर जाणिवे-( the conscious mind ) ला प्राधान्य दिलें जात असे. बुद्ध्या केलेले मनोव्यापार हेंच मानवी मनाचे प्रमुख अंग समजलें जाई. विचार, जाणते हेतु, जाणत्या भावना यांच्यावरच माणसाच्या कायावाचामानसिक कृती मुख्यतः अवलंबून असतात. माणसाच्या व्यक्तित्वाचें आकलन व्हावयाचें असेल तर या बुद्ध्या व्यापारांचा शास्त्रीय अभ्यास करावयाला पाहिजे व तो करणें हेंच मानसशास्त्राचें कार्यक्षेत्र आहे अशी समजूत होती. या विचारप्रणालीला फ्रॉइडनें आपल्या सिद्धांतांनी मोठाच धक्का दिला व माणूस विशिष्ट तऱ्हेनें कां वागतो याचें आकलन करण्यासाठीं त्याच्या मनाच्या नेणत्या ( unconscious ) भागाचा अभ्यास करणें किती जरूर आहे याची अभ्यासकांना जाणीव करून दिली. किंबहुना मानवी मनाचा नेणता भाग हाच जाणत्या भागापेक्षां अधिक महत्त्वाचा व प्रभावशाली आहे, व नेणत्या भागांतील मनोव्यापारावरच मुख्यतः माणसाचें व्यक्तित्व व त्याच्या कृती अवलंबून असतात हें त्यानें प्रतिपादिलें.

## वाङ्मय : मानवी जीवनाचें चित्र

ह्या नवीन दृष्टिकोणाचा परिणाम इंग्रजी वाङ्मयावर झालेला सर्वत्र आढळतो. वाङ्मयांत मानवी जीवन, मानवी अनुभव व मानवी मूल्यें यांचा आविष्कार होतो. मानवी जीवनाचें चित्र काढतांना लेखकाला मानवी मनांच्या व्यापारांबद्दल स्वतःच्या कांहीं कल्पना निश्चित कराव्या लागतात. नाटक-कादंबऱ्यांत माणसें कशीं वागतात, बोलतात, हंसतात, रडतात, कोणते हेतु व ध्येयें मनाशीं बाळगून आपल्या कार्याची दिशा ठरवितात, त्यांच्यांत कसे संघर्ष होतात व गैरसमज माजतात, त्यांची परिणति शेवटीं काय होते वगैरें मानवी जीवनांतील घटकांची व घटनांची गुंफण करून एक मानवी जीवनाचें चित्र तयार केलें असतें व तें चित्र प्रत्येक वाचक स्वतःच्या जीवनानुभूतीशी व जीवनविषयक कल्पनांशी ताडून पाहून लेखकाच्या चित्राचा सारासार विचार करत असतो. **'मॅक्बेथ', 'प्राइड अँड प्रेजुडिस'** आणि **'कॉकटेल पार्टी'** या नाटक-कादंबऱ्यांत लेखकाच्या मानवी मनाबद्दलच्या ज्या कल्पना आहेत त्यांना अनुसरून मानवी जीवनाचें चित्रण केलेलें आहे. शेक्स्पिअर, जेन ऑस्टिन आणि एलियट यांच्यापैकीं प्रत्येकाच्या मानवी मनोव्यापाराबद्दल निश्चित कल्पना आहेत व म्हणूनच माणसें विशिष्ट परिस्थितींत विशिष्ट तऱ्हेनें वागतात असें त्यांनीं दाखविलें आहे. मानसशास्त्रीय सिद्धांतांत फरक झाले कीं त्यांचा परिणाम वाङ्मयीन जीवनचित्रणावर झालेला








दिसून येतो. फ्रॉइडनें जे नवे सिद्धांत पुढें मांडले ते किंवा तत्सम सिद्धांत वाङ्मयीन लेखकांनी आत्मसात केले किंवा विचारांत घेतले व माणसें कशी वागतात व असतात याबद्दलच्या आपल्या कल्पनांत त्यांनी फेरबदल केले असणें साहजीकच आहे. फ्रॉइडच्या नव्या दृष्टिकोणाचा परिणाम वाङ्मयांत दिसून येतो असें म्हणावयास हरकत नाहीं.

## लैंगिक वासनेचें महत्त्व

फ्रॉइडच्या नव्या सिद्धांतांपैकीं कांहीं सिद्धांतांचा विशेष परिणाम वाङ्मयावर झालेला दिसतो. उदाहरणार्थ लैंगिक वासनेचें महत्त्व, विशेषत: नेणत्या मनोव्यापारांत त्याचें असणारें महत्त्व हा एक फ्रॉइडच्या प्रतिपादनांतला भाग सामान्य वाचकांच्या चटकन दृष्टींत भरण्यासारखा आहे. वयांत आलेल्या व्यक्तीच्या वागणुकींत व जाणत्या मनोव्यापारांत पुष्कळदां कांहीं खटकतें, कांहीं चमत्कारिक, अकारण व अनाकलतीय असें वाटतें. व्यक्तीच्या बोलून दाखविलेल्या इच्छा-आकांक्षा, विचार-कल्पना, उद्देश-हेतु व व्यक्तीच्याकडून होत असलेल्या कृती यांत मोठी विसंगति आहे असें दिसतें. या विसंगतीच्या बुडाशीं पुष्कळदां कांहीं प्रबल लैंगिक वासना असूं शकतात. या वासना सामाजिक नीतिनियमांना विरोधी असल्यामुळें व्यक्ती आपल्या मनाचें सर्व बळ एकवटून त्या वासनांना दाबून नष्ट करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असते. पुष्कळदां या वासना अगदीं लहानपणीसुद्धां बळावतात व निकटवर्ती नातेवाईकांवर आधारल्या जातात. प्रसिद्ध **'ईडिपस कॉम्प्लेक्स'** ची कल्पना अशीच आहे. मुलाला आईबद्दल वाटणारी लैंगिक वासना व त्यामुळें बापाबद्दल वाटणारा द्वेष या सामाजिक नीतिनियमांच्या दृष्टीनें अघोरी वाटणाऱ्या मनोविकारांना व्यक्ति दाबून टाकते. पण या जागृत मनाच्या कृतीचा परिणाम इतकाच होतो कीं जाणत्या मनांतून उखडून टाकलेल्या त्या वासना नेणत्या मनांत खोल मूळ धरून बसतात व तेथून व्यक्तीच्या सर्व जागृत मनोव्यापारांवर आपल्या अस्तित्वानें विशिष्ट तिरकस कलाटणी देऊं लागतात. नाना तऱ्हेच्या मनोविकृतींचा त्यामुळें प्रादुर्भाव होऊन व्यक्तीचें व्यक्तिमत्त्व विछिन्न होऊं लागतें. हॅम्लेटच्या मनोविकृतीची मीमांसा कांहींशी या अनुरोधानें डॉ. अर्नेस्ट जोन्स यांनी आपल्या हॅम्लेटवरील निबंधांत (" The Œdipus Complex as an explanation of Hamlet's Mystery ") केली आहे. आईनें क्लॉडियसकाकाशी केलेल्या पुनर्विवाहाबद्दल हॅम्लेटला एवढा उबग येण्याचें कारण त्याच्या आईबद्दलच्या दडपून टाकलेल्या लैंगिक वासना हेंच असावें, किंबहुना शेक्स्पिअरनें हॅम्लेटच्या विकृत मनोवृत्तीचें जें एक प्रभावी चित्रण नाटकांत केलें त्याचेंहि कारण शेक्स्पिअरच्या स्वत:च्या अनुभवांत अशा कांहीं दडपलेल्या वासना असाव्या असें डॉ. जोन्स यांनीं सुचविलें आहे. (" The play is simply the form in which Shakespeare's deepest unconscious feelings find their spontaneous expression, without any inquiry being possible on his part as to the essential nature or source of those feelings ").

## डी. एच्. लॉरेन्स

या प्रकारच्या मनोविकृति बळावूं नयेत अशी इच्छा असेल तर सामाजिक नीतिविचारांत क्रांतिकारक बदल करून लैंगिक भावनांना त्यांच्या नैसर्गिक आविष्काराला मुक्तद्वार करून द्यावें अशा प्रकारची कांहीं विचारसरणी डी. एच्. लॉरेन्स याच्या कादंबऱ्यांत व लेखांत आढळते. लॉरेन्स हा आधुनिक संस्कृतीचा विदारक टीकाकार आहे. आधुनिक सुसंस्कृत समाजांत बोकाळलेला अनैसर्गिकपणा, बुद्धिप्रामाण्य, यांत्रिकपणा इत्यादी दोषांमुळें व्यक्तींची नैसर्गिक वाढ खुरटते व विकृत मनोवृत्ति



अनुक्रमणिका






बळावतात अशी त्याची तक्रार आहे. ' Psycho-analysis and the unconscious ' या पुस्तकांत लॉरेन्सनें जाणत्या मनाबद्दल महत्त्वाचीं विधानें केलीं आहेत. जाणतें मन व प्रबल इच्छा-शक्ति यांच्यांत राक्षसी यंत्रांचें सामर्थ्य आहे व या शक्ती आपल्या स्टीमरोलरखालीं माणसाचें नैसर्गिक, नेणतें जीवन चिरडून चिपाटून टाकतात असें तो म्हणतो. ( The mind is the dead end of life. But it has all the mechanical force of the non-vital universe. It is a great dynamo of super-mechanical force. Given the will as accomplice, it can even arrogate its machine-motions and automatizations over the whole of life, till every tree becomes a clipped tea-pot and every man a useful mechanism. So we see the brain, like a great dynamo and accumulator, accumulating mechanical force and presuming to apply this to the living unconscious, subjecting every thing spontaneous to certain machine principles called ideals or ideas. And the human will assists in the humiliating and sterilying process. " )

फ्रॉइडच्या मानसशास्त्रीय प्रमेयांत लैंगिक वासनांचें सर्वगामित्व प्रतिपादिलें आहे. लॉरेन्सच्या लेखांत व कादंबऱ्यांतहि लैंगिक वासनांना नैसर्गिक वाव देण्याचें महत्त्व विशद केलेलें आहे. फ्रॉइडनें ज्याप्रमाणें अस्मिता व लैंगिकवासना (Ego and Libido ) यांच्या द्वंद्वाचें महत्त्व वर्णिलें आहे त्याप्रमाणें लॉरेन्सनें लैंगिकवासना व व्यक्तिमत्त्व या द्वंद्वाचें महत्त्व जाणलें आहे. प्रेमाबद्दलच्या ' प्लेटॉनिक ' कल्पनांचा फोलपणा व प्रेमाचें वास्तव रूप, लैंगिक प्रेमाचा व्यक्तीच्या स्वत्वावर होणारा आघात व व्यक्तीचा आपलें स्वत्व शाबूत राखण्याचा प्रयत्न, योग्य समाजरचनेला आवश्यक असणारें नैसर्गिक लैंगिकप्रेमाचें अधिष्ठान व त्याचें निकोप स्वरूप इत्यादि सूत्रांची गुंफण लॉरेन्सनें ' Women in Love ' या व इतर कादंबऱ्यांत मोठ्या कुशलतेनें केली आहे. तो लैंगिकप्रेमाचें महत्त्व व प्राबल्य मानतो पण त्याबरोबरच व्यक्तीच्या विकासाला आवश्यक असणाऱ्या स्वातंत्र्याचें व एकलेपणाचें महत्त्वहि जाणतो. वर निर्देशिलेल्या कादंबरींत बर्किन या पात्राची विचारसरणी पहाण्यासारखी आहे. लैंगिकप्रेमाचा प्रभाव त्याला माहीत आहे व त्या महापुरांत व्यक्तित्वाचे बांध ढांसळून जातात याचीहि त्याला जाणीव आहे. आणि म्हणूनच या महापुरापासून व्यक्तीच्या वेगळेपणाची जपणूक करावयास हवी असें तो म्हणतो. स्त्री आपल्या लैंगिक आकर्षणानें पुरुषाला आपल्या भोंवतीं नाचावयास लावून गुलाम बनविते, माता म्हणून तिनें पुरुषाला जन्म दिला व स्त्री म्हणून ती त्याच्यावर पुन्हा प्रभुत्व गाजवूं पहाते. पुरुषाला आपल्या व्यक्तित्वाचा, स्वत्वाचा विकास करावयाचा असेल तर स्त्रीच्या लैंगिक प्रेमाची हीं बंधनें शिथिल केली पाहिजेत, अशा प्रकारचे बर्किनचे विचार आहेत. त्याला आपल्या प्रेमपाशांत गुंतवू पाहाणारी हर्मिओनी हिच्याबद्दल विचार करतांना त्याच्या मनांत आलें: " Did he not know it in Hermione. Hermione, the humble, the subservient, what was she all the while but the Dolorosa, in her subservience, claiming with horrible, insidious arrogance & female tyranny her own again, claiming back the man she had borne in suffering. By her very







suffering and humility she bound her son with chains, she held him her everlasting prisoner. "

## जेम्स जॉईस

लैंगिक प्रेम व वासना यांचें वैयक्तिक व सामाजिक जीवनांतले महत्त्व ओळखून, प्रचलित नीतिकल्पनांच्या चाकोरींतून बाहेर येऊन त्या प्रबल नैसर्गिक शक्तींचें स्वरूप व कार्य मोकळेपणानें विशद करून मग त्यांना जीवनांत योग्य तें स्थान द्यावें अशा प्रकारची जी विचारसरणी लॉरेन्सच्या लेखनांत आढळते ती फ्रॉइडच्या मानसशास्त्रांत प्रतिपादिलेल्या लैंगिक वासनेच्या (Libido किंवा Eros ) सिद्धांताशी बरीचशी जुळती आहे. या नव्या कल्पनांचा प्रसार झाल्यामुळें लॉरेन्स प्रमाणें इतरहि लेखकांच्या वाङ्मयांत त्यांचा वापर झालेला आढळतो. फ्राइडनें प्रचलित मानसशास्त्रीय कल्पनांना जो धक्का दिला त्यामुळें वाङ्मयहि जुन्या चाकोरीतून बाहेर येऊन नवे प्रयोग व नव्या व्यक्तिरेखा करूं व रेखाटूं लागलें. विशेषतः व्यक्तीच्या मनोव्यापाराचें वास्तव दिग्दर्शन करण्याचें साधन म्हणून व्यक्तीच्या संज्ञाप्रवाहाचें ( stream of consciousness ) दिग्दर्शन करण्याची पद्धत नव्यानेंच वापरण्यांत येऊं लागली. माणूस दुसऱ्यांशी बोलतांना पुष्कळशा कृत्रिमपणानें, आपले खरें हेतु बाहेर न यावेत अशी काळजी घेऊन, लोकांवर एक विशिष्ट छाप पाडण्याच्या दृष्टीनें बोलतो. त्याच्या संभाषणांत व भाषणांत त्याचें खरें स्वरूप व मनोव्यापार उघड होत नाहींत. म्हणून लेखक माणसाच्या संज्ञाप्रवाहाचें जसेच्या तसें चित्रण करतो, अंतर्मनांतील स्वगतभाषण ( internal monologue ) लिहून वाचकांना व्यक्तीचें वास्तवदर्शन घडवितो. जेम्स जॉइस या कादंबरीकाराच्या 'युलीसिस' या कादंबरींत या पद्धतीचा पद्धतशीरपणें वापर केला आहे. डब्लिनमधील तीन व्यक्तींच्या आयुष्यांतील एका दिवसाचें यथातथ्य वर्णन कादंबरींत आहे व प्रत्येक व्यक्तीच्या संज्ञाप्रवाहाचें क्ष-किरणांनी काढावें असें चित्र दाखविलें आहे. बाहेरील जग व परिस्थिति, जाणत्या मनाचे व्यापार व संज्ञाप्रवाह या सर्वांचा मिलाफ होऊन एक वास्तव आणि विदारक असें सत्यकथन कादंबरींत केलें जातें. पुष्कळदां संज्ञाप्रवाहांतील स्पष्टास्पष्ट विचार-विकार-कल्पना, शब्दांचें परस्परावलंबित्व व संदर्भासहित विश्लेषण यांचें आकलन होणें कठीण होते व परिच्छेद दुर्बोध वाटतात. पण या पद्धतीमुळें शब्दचित्राच्या वास्तवपणाला धार येते व सामान्यत: अदृश्य व अतर्क्य असलेल्या मानवी मनाच्या कप्प्यांत वाचकाला डोकावून पाहतां येतें. कादंबरीकार हा फ्रॉइडच्या मनोविश्लेषणाच्या तंत्राचा वापर करून व्यक्तीच्या मनांतल्या खोल खोल रूजलेल्या जागृत, अर्धसुप्त व सुप्त विचार-विकार-कल्पनांचा आविष्कार करूं शकतो व वाङ्मयांत एक नवीन वास्तवता निर्माण करतो.

फ्राइडच्या मनोविश्लेषणशास्त्राचें व मानसशास्त्रांचें क्षेत्र फारच विस्तीर्ण आहे. येथें केवळ दिग्दर्शन करण्याच्या हेतूनें त्याच्या अभिनव प्रमेयांपैकीं एक-दोहोंचा दाखला घेऊन आधुनिक इंग्रजी वाङ्मयावर त्याचा किती परिणाम झाला आहे व त्यामुळें वाङ्मयाला एक नवेंच वळण कसें लागलें आहे याचा थोडासा परामर्श फ्राइडच्या जन्मशताब्दीच्या निमित्तानें घेतला आहे.

---










प्रा. मधु दंडवते

# " आशियाई समाजवाद "

मुंबई येथें नुकत्याच भरलेल्या आशियाई समाजवादी परिषदेच्या निमित्तानें आशियांतील समाजवादी आंदोलनाकडे जगांतील नामवंत समाजवाद्यांचें लक्ष वेधलें गेलें होतें. " आशियाई समाजवादा"च्या कल्पनेमुळें समाजवादी वर्तुळामध्यें निरनिराळ्या प्रकारच्या प्रतिक्रिया निर्माण झाल्या आहेत. समाजवादासारख्या विश्वव्यापी तत्त्वज्ञानाला प्रादेशिक स्वरूप देऊन त्याला संकुचिततेच्या खाईत लोटण्यामध्यें तर आशियाई समाजवादाची परिणति होणार नाहीं ना अशी प्रामाणिक शंका देखील कांहीं युरोपीय समाजवाद्यांच्या मनामध्यें आल्याशिवाय राहिली नाहीं. ' सोशलिस्ट इंटरनॅशनल ' ही आंतरराष्ट्रीय समाजवाद्यांची संघटना असतांना ' एशियन सोशलिस्ट कॉन्फरन्स'ची आवश्यकता काय हा प्रश्नहि कांहीं समाजवाद्यांच्या डोक्यामध्यें घोळत आहे. या पार्श्वभूमीवरून आशियांतील समाजवादी चळवळीची, विचारसरणीची व आशियांतील समाजवाद्यांपुढें निर्माण झालेल्या कांहीं वैचारिक समस्यांची चर्चा होणें आवश्यक आहे.

## प्रादेशिक वैशिष्ट्य म्हणजे संकुचितता नव्हे !

समाजवादी दृष्टि ही मूलतः विश्वव्यापी दृष्टि आहे. अखिल मानवजातीचा विकास साधू इच्छिणारी ती एक जीवनपद्धति आहे. आणि म्हणूनच राष्ट्राच्या भौगोलिक मर्यादांनीं समाजवादाला जखडून टाकणें अयोग्य आहे. "आशियाई समाजवादा"-चा पुरस्कार करतांना आशियाई समाजवाद्यांची दृष्टि देखील हीच आहे. तथापि विश्वव्यापी दृष्टि म्हणजे विचारांचा आणि आंदोलनाचा ठोकळेबाज एकजिनसीपणा नव्हे. आशियाई समाजवाद्यांची दृष्टि ही विविधतेंतील एकतेची दृष्टि आहे. आशियांतील आर्थिक विकास, राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळी, लोकशाहीपद्धति जनतेमध्यें रुजविण्याचें कार्य ह्या सर्वांचा इतिहासक्रम युरोपमधील देशांपेक्षां तौलनिक दृष्ट्या वेगळा राहिला आहे. आशियांतील देशांच्या समस्यांमध्यें एकप्रकारचें साधर्म्य आढळून येत आहे. व केवळ याच महत्त्वाच्या कारणास्तव विश्वव्यापी समाजवादी दृष्टीचा स्वीकार करूनहि आशियांतील समाजवाद्यांना आशियाच्या पातळीवरून अनेक समस्यांचा विचार करावा लागतो.

## युरोप आणि आशिया

पश्चिम युरोपमधील आर्थिक दृष्ट्या विकसित राष्ट्रांतील समाजवादी चळवळीचें स्वरूपाहून आशियांतील मागासलेल्या राष्ट्रांमधील समाजवादी चळवळीचें स्वरूप भिन्न आहे. पश्चिम युरोपमधील समाजवादी आंदोलनाचा मागोवा घेतल्यास दिसून येतें कीं युरोपमधील समाजवादी चळवळीचा विकास हा आशियांतील राष्ट्रांप्रमाणें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीच्या अवस्थेमधून झाला नाहीं, तर भांडवलशाहीच्या प्रत्यक्ष विरोधामधूनच झाला. युरोपमधील राष्ट्रांचा आशियांतील वसाहतवादाचा आणि साम्राज्यवादाचा वारसा सर्वच युरोपीय समाजवाद्यांनीं संपूर्णपणें व खंबीरपणें अनेक वर्षें झिडकारिला नाहीं. यामुळेंच युरोपीय समाजवादी व आशियाई समाजवादी यांच्यामध्यें भावनात्मक एकता ( emotional integration ) निर्माण होऊं शकली नाहीं. युरोपमधील सत्तारूढ समाजवाद्यांनीं देखील वसाहतविषयक अनेक प्रश्नांवर केवळ संकुचित व्यवहारवादी ( Pragmatic ) भूमिका घेतली







व आपल्या मौलिक समाजवादी निष्ठेला मुरड घातली. वसाहतवादविरोधी भावना अत्यंत प्रभावी असलेल्या आशियांतील समाजवादी पक्षांना यामुळेंच स्वतंत्र प्रादेशिक स्वरूपाची संघटना उभी करावी लागली आहे.

## एकात्म सामाजिक दृष्टीचा अभाव

आशियांतील निरनिराळया समाजवादी पक्षांच्या वैचारिक व संघटनात्मक विकासाचा इतिहास पाहिला तर त्या सर्वांमध्यें प्रकर्षानें एक उणीव आढळून येते. त्या सर्व पक्षांनीं एकात्म सामाजिक दृष्टि ( Integrated Social outlook ) आपल्या आंदोलनांत निर्माण करण्याच्या दृष्टीनें विशेष यश मिळविलें नाहीं. अर्थात या कार्यामध्यें आशियाई समाजवाद्यांच्या मार्गात अनेक अडचणी होत्या हें मान्य करावे लागेल. उदाहरणार्थ आशियामधील देश परकीय वसाहतवादाच्या पंजाखालीं अनेक वर्षें राहिल्यामुळें आशियाई समाजवादी शक्तींचा उदय हा राष्ट्रीय चळवळींतूनच झाला. व राष्ट्रीय चळवळीमध्यें वैचारिकदृष्ट्या आपणाशी संपूर्णपणें सहमत नसलेल्या गटांबरोबर देखील राष्ट्रीय आघाडी समजून कार्य करावें लागत असल्यामुळें समाजवादी विचारसरणीला वैचारिक स्पष्टता निर्माण करण्याच्या कार्याला बऱ्याच वेळां मुरड घालावी लागली. राष्ट्रीय स्वातंत्र्य संपादन करण्याच्याच कार्यावर सुरुवातीस अधिक भर द्यावा लागल्यामुळें आशियांतील समाजवादाचा चेहरा रेखीव व सुस्पष्ट होऊं शकला नाहीं.

ब्रह्मदेशामध्यें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत समाजवाद्यांचें बरेंच वजन होतें. १९३० मध्यें ब्रह्मदेशांत झालेला शेतकऱ्यांचा उठाव व कामगारांचा सार्वत्रिक संप यामुळें समाजवादी शक्ती वाढीस लागल्या. त्यानंतर युद्धकाळांत निर्माण झालेल्या 'ॲन्टी फॅसिस्ट फ्रीडम लीग' या सर्वपक्षीय आघाडींतून कार्य करणारा समाजवादी पक्ष अधिक प्रभावी बनला. या लीगमध्यें रेव्होल्यूशनरी पार्टी ( याचेच नंतरच्या बर्मा सोशलिस्ट पार्टीत रूपांतर झालें ), कम्युनिस्ट पार्टी व बर्मीज इंडिपेन्डण्ट पार्टी यांचा समावेश होता. या आघाडीतील निरनिराळया पक्षांच्या स्वरूपामुळें बर्मा सोशलिट पार्टी वैचारिक स्पष्टता निर्माण करण्याच्या कार्यामध्यें विशेष यश मिळवूं शकली नाहीं. बुद्ध आणि मार्क्स या दोहोंच्याहि विचारांचा पगडा ब्रह्मदेशांतील समाजवाद्यांच्या विचारसरणीवर आहे. तथापि आपल्या विचारसरणीचें एकात्म चित्र रेखाटण्यांत त्यांना भरीव यश आलेलें नाहीं. भारतांतील समाजवादी पक्ष हा देखील राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या काँग्रेसमधील एक गट म्हणूनच सुरुवातीस उदयास आला. युद्धपूर्व काळांत डाव्या पक्षांच्याबरोबर संयुक्त आघाड्या बनविण्याचेंच राजकारण पक्षानें मान्य केल्यामुळें मार्क्सवादाचा अंधस्वीकार करण्यापलिकडे समाजवादी पक्ष आपला विशिष्ट लोकशाही समाजवादी दृष्टीकोन जनतेमध्यें व विचारवंतांमध्यें रुजवूं शकला नाहीं. हुकुमशाही कम्युनिझम आणि लोकशाही समाजवाद ह्या जीवनाच्या दोन परस्पर विरोधी दृष्टी आहेत हें सत्य जनतेमध्यें रुजविण्याचें वैचारिक कार्य देशांतील समाजवादी शक्ती या कालखंडामध्यें करूं शकल्या नाहींत.

इंडोनेशियामधील समाजवादी पक्षाचा जन्म देखील राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींतच झाला. १९२७ मध्यें इंडोनेशियाच्या राष्ट्रीय स्वातंत्र्य-निर्मितीसाठीं इंडोनेशियन नॅशनॅलिस्ट पार्टीची स्थापना झाली होती. १९२९ मध्यें या पार्टीचे तीन गट झाले. त्यांतील एका गटानें सुतान शरियर यांच्या नेतृत्वाखालीं मार्क्सवादी विचारसरणीवर आधारलेला पक्ष स्थापन केला. १९४५ मध्यें याच पक्षाचे रूपांतर इंडोनेशियन सोशॅलिस्ट पक्षांमध्यें झालें.

लेबॅनॉन, मलाया, व्हिएटनाम, जपान वगैरे आशियाई राष्ट्रांमधील समाजवादी पक्षांच्या विका-







साचा इतिहास देखील थोड्याफार फरकानें अशाच स्वरूपाचा आहे.

## राष्ट्रवादी आणि कम्युनिस्ट

राष्ट्रवादी चळवळींतून आशियांतील समाजवादी चळवळींचा विकास झाल्यामुळें वैचारिक स्पष्टता निर्माण करण्याच्या कार्याकडे आशियाई समाजवाद्यांना विशेष लक्ष देतां आलें नाहीं ही एक प्रमुख उणीव आशियाई समाजवाद्यांच्या कार्यांत राहिली. पण त्याचबरोबर राष्ट्रवादी शक्तींशीं संपूर्णपणें समरस झाल्यामुळ समाजवादी शक्तींना दुसरा एक अप्रत्यक्ष फायदा झाला. आशियामधील जवळ जवळ सर्वच राष्ट्रांमध्यें लोकशाहीविरोधी कम्युनिस्ट पक्ष कार्य करीत आहे. जनतेच्या राष्ट्रीय आकांक्षांशीं समाजवादी समरस झाल्यामुळें व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या आंदोलनांत ते आघाडीवर राहिल्यामुळें सामान्य जनतेला आशियांतील कम्युनिस्ट पक्ष आपल्याकडे मोठ्या संख्येनें खेचूं शकले नाहींत. राष्ट्रीय चळवळीबाबत समाजवादी उदासीन राहिले असते व राष्ट्रीय चळवळींत निरनिराळ्या देशांतील कम्युनिस्ट पक्षांना प्रतिष्ठा लाभली असती तर आशियांतील राष्ट्रांना कम्युनिस्ट–राजकारणाकडे आकर्षित करण्यांत कम्युनिस्टांना बरेंच मोठें यश लाभलें असतें. आशियाई समाजवाद्यांनीं हा धोका टाळल्यामुळें आशियांतील लोकशाहीवरील एक मोठें गंडांतर टळलें आहे.

पूर्व युरोपमधील कम्युनिस्ट राष्ट्रांमधील राष्ट्रीय भावना दडपून मास्कोच्या कलाप्रमाणें धोरण आंखण्याच्या सोव्हिएटच्या प्रयत्नांतून युगोस्लाव्हिया, हंगेरी, पोलंड इ. पूर्वयुरोपमधील देशांत जनतेचे उठाव झाले आहेत. ही परिस्थिति सावरून धरण्यासाठीं आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट धोरणामध्यें कांहीं अंशीं थातूर मातूर बदल होण्याची शक्यता आहे. राष्ट्रवादी आणि कम्युनिस्ट यांच्यामध्यें निरनिराळ्या देशांत निर्माण झालेली दरी बुजविण्याचाहि प्रयत्न होईल. अशा परिस्थितींत राष्ट्रवाद्यांच्या मनाची लोकशाही समाजवादानें घेतलेली पकड कमी न होणें लोकशाहीच्या भवितव्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. याद‍ृष्टीनें विचार करतां आशियाई समाजवाद्यांनीं राष्ट्रीय आंदोलनांतून मिळविलेली शक्ती लोकशाहीच्या विकासास उपकारकच ठरणार आहे.

## आशियाई समाजवाद व आंतरराष्ट्रीय घटना

युरोपमधील सामाजिक लोकशाहीच्या ( Social Democracy ) विकासाचा पूर्वइतिहास पाहिला तर आणीबाणीच्या वेळीं जेव्हां जेव्हां ठाम भूमिकेची व स्पष्ट कृतीची अपेक्षा जनतेनें केली तेव्हां तेव्हां युरोपमधील बहुतेक समाजवाद्यांनीं जनतेच्या अपेक्षा फोल ठरविल्या असेंच आढळून येईल. अर्थात् यालाहि कांहीं अपवाद आहेतच. आशियाई समाजवाद्यांनीं मात्र हा दोष कटाक्षानें टाळला आहे. निरनिराळ्या आंतरराष्ट्रीय घटनांबाबत आशियाई समाजवाद्यांनीं घेतलेली भूमिका ही खंबीर व कोणत्याहि सत्ताबाज आंतरराष्ट्रीय गटाच्या राजकारणांत गुरफटले न जाण्याच्या धोरणाशीं सुसंगत अशीच आहे. याचें उत्तम प्रत्यंतर मुंबई येथें भरलेल्या आशियाई समाजवादी परिषदेच्या अधिवेशनांत आंतरराष्ट्रीय स्फोटक परिस्थितिबाबत मंजूर केलेल्या निवेदनांत पहावयास मिळेल. या परिषदेमध्यें सामील झालेले तीन घटक पक्ष आज अधिकारारूढ आहेत, तथापि हे अधिकारारूढ पक्ष परिषदेच्या पायातील बेड्या ठरल्या नाहींत ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. बऱ्याच वेळीं आंतरराष्ट्रीय परिषदांमध्यें अधिकारारूढ पक्ष सामील झाले म्हणजे व्यवहारवादाच्या आणि मुत्सद्देगिरीच्या नांवाखालीं मूलभूत सिद्धांतांना तिलांजली दिली जाते व असमर्थनीय घटनांचेंहि समर्थन करावें लागतें. मुंबई येथील आशियाई समाजवादी परिषद भरली तेव्हां आंतरराष्ट्रीय परिस्थिति स्फोटक बनली होती. विश्वयुद्धाच्याच उंबरठ्यावर आपण उभे आहोंत असा

भास निर्माण झाला होता. पश्चिम आशियांतील व पूर्व युरोपमधील घटना याबाबत आशियाई समाजवादी कोठली ठाम भूमिका घेतात याकडे सर्वांचें लक्ष लागलें होतें. आशियाई समाजवाद्यांनीं ह्या घटनांबाबत घेतलेली भूमिका तत्त्व व व्यवहार या दोन्हीहि कसोट्यांवर घासून पाहिली तरी ती स्वागतार्हच ठरणार आहे.

इजिप्तमध्यें आक्रमणास सुरुवात करणाऱ्या इस्त्रायलमध्यें समाजवाद्यांचें सरकार व ह्या आक्रमणाला धार देणाऱ्या ब्रिटन व फ्रान्सपैकीं फ्रान्समध्येंहि समाजवाद्यांचेच संमिश्र सरकार. अशा परिस्थितींत भिडेखातर ह्या आक्रमणाकडे आशियाई समाजवादी परिषद डोळेझांक करणार कीं काय अशी शंका कांहीं शंकाखोर लोकांच्या मनामध्यें डोकावून गेली. परंतु इजिप्तमधील आक्रमणाचा आशियातील सर्व समाजवाद्यांनीं एकमुखानें निषेध केला. त्याच बरोबर दुसऱ्या एका संभाव्य धोक्याकडे जगांतील निरनिराळ्या सरकारांच्या प्रमुखांचें लक्ष आशियाई समाजवाद्यांनीं खेचलें आहे. इजिप्तमधील आक्रमक सेना मागें हटल्या नाहींत तर रशियन फौजा इजिप्तमध्यें उतरतील असा धोक्याचा इशारा सोव्हिएट रशियानें दिला होता. साम्राज्यविरोधाच्या तीव्र भावनेमुळ या सूचनेचे स्वागत करणारे प्रामाणिक लोकहि कांहीं कमी नाहींत. तथापि कोठल्याहि बड्या राष्ट्रांच्या फौजा एकतर्फी रीतीनें ईजिप्तमध्यें उतरल्यास आंतरराष्ट्रीय परिस्थिति स्फोटक होईल असा स्पष्ट इशारा आशियाई समाजवाद्यांनीं दिला. दुसऱ्या महायुद्धाचा अनुभव आपणास स्पष्टपणें दाखवितो कीं अन्यराष्ट्रांच्या विमोचनासाठीं गेलेल्या सेना विमोचनाचें कार्य पुरें झाल्यानंतर नवें दास्य निर्माण करतात. मग मुक्तीसेना रशियाची असो, इंग्लंडची असो कीं अमेरिकेची असो. सत्तेचीं नवीं क्षेत्रें (sphere of influence) धुंडण्याचें राजकारण सुरूं होतें व त्यातूनच शीतयुद्धाचे डांवपेच टाकलें जातात. हा सर्व अनुभव लक्षांत घेऊनच आशियाई समाजवाद्यांनीं वरील निःसंदिग्ध भूमिका स्वीकारली आहे.

हंगेरी व पोलंडच्या प्रश्नाबाबत आशियाई परिषदेनें केलेलें मार्गदर्शन हें निःसंशय खंबीरपणाचें व लोकशाहीवाद्यांना साजेसेंच आहे. शांततामय सहजीवन आणि पंचशील यांचा अहोरात्र जप करणाऱ्यांनीं हंगेरीतील जनस्वातंत्र्यावरील आक्रमणाची दखल घेतली नाहीं. सोव्हिएट रशियानें हंगेरींतील जनतेचा उठाव म्हणजे प्रतिक्रांति असल्याचें घोषित केलें. शौर्यानें लढणाऱ्या हंगेरीच्या जनतेनें इतर राष्ट्रांच्या नैतिक पाठिंब्यासाठीं हांक दिली. संयुक्त राष्ट्रसंघास आपल्या तटस्थतेचें संरक्षण करण्यासाठीं कळकळीची विनंती केली. पण भारतसरकारनें मात्र हंगेरीच्या प्रश्नावर स्वतःला कम्युनिस्ट राष्ट्रांच्याच गटांत गोवून घेतलें. आशियाई समाजवाद्यांनीं मात्र आपली स्वातंत्र्यावरील निष्ठा ढळूं दिली नाहीं व आशियाई समाजवादी परिषदेंत मंजूर केलेल्या ठरावांत पोलंड व हंगेरीमधील स्वातंत्र्याच्या आकांक्षेचे स्वागत केलें, रशियन फौजा हंगेरींतून हलविण्याची मागणी केली व संयुक्तराष्ट्रांनीं रशियन फौजा हंगेरीतून हलविण्यासाठीं आपलें वजन खर्च करावें अशी विनंती केली आहे.

भारतसरकारनें हंगेरीबाबत संपूर्णपणें अन्यायकारक भूमिका संयुक्त राष्ट्रसंघाच्या सर्वसाधारण असेंब्लीमध्यें घेतली व हंगेरीच्या आर्त आवाजांस साथ देण्यास नकार दिला. तथापि मुंबई येथील आशियाई समाजवादी परिषदेमध्यें या बाबत निश्चित निर्णय घेऊन 'कोलंबो' राष्ट्र प्रधानमंत्र्यांच्या बैठकीस गेलेले ब्रह्मदेश व सिलोनचे पंतप्रधान ऊ बा स्वे व बंदरनायके यांनीं या बैठकींत खंबीर भूमिका घेतली व कांहीं प्रमाणांत पंडित नेहरूंना आपली भूमिका बदलण्यास भाग पाडलें. नेहरूंनीं







हंगेरीबाबतच्या आपल्या मूळ भूमिकेमध्यें हळूंहळूं बदल करण्यास सुरुवात केली आहे हा एका अर्थानें आशियाई समाजवाद्यांचा नैतिक विजयच आहे.

## राजकीय व आर्थिक समस्या

आशियाई समाजवाद्यांना आपलें स्वतंत्र संघटन करण्यासाठीं जीं निरनिराळीं कारणें आहेत त्यांमध्यें आशियामधील बहुसंख्य राष्ट्रांची अविकसित स्थिति हें एक प्रमुख कारण आहे. युरोपीय समाजवाद्यांपेक्षां वेगळ्या प्रकारचा आर्थिक पुनर्रचनेचा दृष्टिकोण स्वीकारणें आशियाई समाजवाद्यांच्या दृष्टीनें अपरिहार्य झाले आहे. आशियांतील लोकसंख्येचा भार, मागासलेले उत्पादनतंत्र व भांडवलाची कमतरता यांचा विचार करतां युरोपीय समाजवाद्यांची आर्थिक विकासाची विचारसरणी संपूर्णपणें मान्य करणें आशियाई समाजवाद्यांना शक्य होणार नाहीं. युरोपमध्यें मान्यवर झालेली केंद्रिभूत प्रातिनिधिक लोकशाही त्याच स्वरूपामध्यें आशियाई राष्ट्रांत यशस्वी होईल किंवा नाहीं ह्याचाहि आशियाई समाजवाद्यांना विचार करावा लागणार आहे. राजकीय सत्तेचें वितरण (Political diffusion) करण्याचें आशियाई समाजवाद्यांनीं जरी मान्य केलें तरी आर्थिक क्षेत्रांतील विकेंद्रीकरणाशिवाय केवळ राजसत्तेच्या वितरणांतून लोकशाही यशस्वी व स्थिर होऊं शकेल कां ह्या प्रश्नाचेंहि समाजवाद्यांना उत्तर शोधावें लागेल. भूक आणि दारिद्य यांनीं ग्रस्त झालेल्या जनतेचें जीवन सुधारण्यासाठीं देशाचा विकास झपाट्यानें करणें आवश्यक आहे हा दृष्टिकोण प्रभावी बनत आहे. पण हें विकासकार्य कोणत्याहि प्रकारचे राजकीय अडथळे विरोधी पक्षाकडून येऊं न देतां पार पाडावयाचें असेल तर अनेक पक्षपद्धतीवर आधारलेल्या लोकशाहीमधून हें कार्य पार पाडतां येणार नाहीं, हा घातक विचारहि एकपक्ष-पद्धतीची तरफदारी करणारे लोक मांडत आहेत, याच संदर्भात नियोजन व स्वातंत्र्य यांच्या परस्परसंबंधाचाहि प्रश्न महत्त्वाचा बनला आहे. विकासाची गती वाढविण्यासाठीं 'नियोजन आणि स्वातंत्र्य' याबाबतचा कम्युनिस्ट दृष्टिकोन मान्य करण्याचें आकर्षण देखील जनतेमध्यें आहे. लोकशाहीवर दूरगामी आघात करणाऱ्या ह्या दृष्टिकोणापासून जनतेला परावृत्त करण्याचें कार्य आशियामधील लोकशाही समाजवाद्यांना करावें लागणार आहे. चीनमध्यें कम्युनिस्टांच्या औद्योगिकरणाच्या योजनेची प्रत्यक्ष अंमलबजावणी चालूं असतां लोकशाही नियोजनाची कार्यक्षमता जनतेस पटवून देण्याची जबाबदारी ब्रह्मदेश, सिलोन, इस्त्रायल येथें सत्तारूढ असलेल्या समाजवाद्यांवर प्रामुख्यानें आहे. आर्थिक पुनर्रचनेचा लोकशाहीसमाजवादी कार्यक्रम अकार्यक्षम ठरला तर अविकसित राष्ट्रांच्या दृष्टीनें कम्युनिझम् हीच एक जनतेस विमुक्त करणारी शक्ति (Liberating force) आहे अशी भावना जनतेमध्यें रुजेल व ही भावना दृढमूल झाली तर लोकशाहीचा अंतच ठरेल. या दृष्टीनें आशियाई समाजवादी परिषदेनें नेमलेल्या अर्थतज्ज्ञांच्या समितीपुढील कार्य बिकट तथापि तितकेंच महत्त्वाचें आहे. आशियामधील अधिकारारूढ समाजवादी पक्षांनीं आपापल्या देशांत आर्थिक पुनर्रचनाविषयक कार्यक्रमांत आलेल्या अनुभवांची देवाण घेवाण करावी. राष्ट्रीयीकरण, सहकारी शेती, करविषयक धोरण इ० प्रश्नांबाबत आलेल्या अनुभवांची इतर समाजवाद्यांना माहिती द्यावी व परस्पर सहकार्यानें लोकशाही समाजवादी आंदोलन समृद्ध बनविण्याचा प्रयत्न करावा असा निर्णय मुंबई येथें भरलेल्या आशियाई समाजवादी परिषदेनें घेतलेला आहे. या परिषदेमधून आशियाई समाजवाद्यांना आपल्यावरील जबाबदारीची अधिक जाणीव होईल व भांडवलशाही आणि कम्युनिझम या दोन्हीहि प्रतिगामी पद्धतींच्या तावडींतून आशियास विमुक्त करून नवा लोकशाही समाजवादी आशिया निर्माण करण्याची प्रेरणा सर्व समाजवाद्यांना ह्या परिषदेमधून मिळेल अशी आशा आहे.








## पत्रव्यवहार

श्री. कार्यकारी संपादक 'नवभारत' यांस--

स. न. वि. वि.

प्रा. शहांचा 'आपली बुद्धिवादी परंपरा' हा लेख वाचला. (नवभारत सप्टेंबर १९५६) आपल्या बुद्धिवादी परंपरेबद्दल अभिमान धरायला वाव नाहीं असें निराशावादी मत फारसें पटत नाहीं.

एक तर हें सिद्ध करण्यासाठीं लेखकानें अगदीं कोपऱ्यांतील दोन चार उदाहरणें शोधून काढली आहेत व तीं सुद्धां फारशीं बळकट वाटत नाहींत.

पहिलें उदाहरण म्हणजे प्रा. द. रा. रानडे यांच्या गुरूच्या व्याख्येबद्दल. लेखकाच्या मतें "देवाचें गुप्त रूप दाखविणारा तो गुरु" ही रानडे यांनीं गुरूची अभिनव व्याख्या दिली आहे. परंतु या व्याख्येला अभिनव म्हणण्यांत लेखकानें महाराष्ट्रांतील संतवाङ्मयाबद्दलचे आपले अज्ञान प्रगट केलें आहे. महाराष्ट्रांतील शिवकालीन बुद्धिवादी राजकीय मुत्सद्दी संत रामदास यांनींहि दासबोधांत "गुरुवीण तो सर्वथाहि न दीसे" असें देवाचें वर्णन केलें आहे. देवाचा साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग अध्यात्मशास्त्रांत तसेंच योगशास्त्रांतहि दाखवून दिला आहे. पॉंडेचरीच्या अरविंदाश्रमांत अजूनहि त्याचें अध्ययन व अध्यापन होतें. पदार्थविज्ञान शास्त्रानें किंवा रसायन शास्त्राच्या प्रयोगानें देवाचें अस्तित्व सिद्ध करतां येत नाहीं, म्हणून योगशास्त्रानें अगर अध्यात्मशास्त्रांतील प्रयोगांनीं ज्यांनीं देवाचे दर्शन घेतलें (महाराष्ट्रांतील तुकाराम, एकनाथ, ज्ञानेश्वर वगैरे संतमंडळी किंवा अगदी अलीकडे रामकृष्ण परमहंस व विवेकानंद) ते बुद्धिवादाशीं विसंगत होते असें म्हणणें हें शुद्ध निर्बुद्धपणाचें लक्षण आहे.

"देव या शब्दाला वस्तुसंबद्ध अर्थ नाहीं" हें कोणातरी भाषाशास्त्रज्ञाचें मत मानण्यापेक्षां "देव आहे व मला तो रामकृष्ण परमहंसांनीं (माझ्या गुरुनी) दाखविला" हा स्वामी विवेकानंदांचा अनुभव मान्य करणें जास्त बुद्धिवादी ठरेल.

संतः परीक्ष्यान्यतरद् भजन्ति। मूढः परप्रत्ययज्ञेयबुद्धिः हें खरें आहे. परन्तु एखाद्या अबोध बालकानें विस्तवाला हात लाऊन पाहिला तर आपण त्याच्या बालबुद्धीची कींव करू एवढेंच.

अध्यात्मशास्त्र एक शास्त्र आहे हें त्या शास्त्रामध्यें प्रयोग करणाऱ्या सर्वांना येणाऱ्या एकाच प्रकारच्या प्रचीतीवरून सिद्ध होतें. साक्षात्कारासाठीं गुरूची आवश्यकता कबीरांनीहि आपल्या दोह्यामध्यें एकेठिकाणीं सांगितली आहे. गुरु गोविंद दोऊं खडे कॉंके लगहूँ पाय। बलिहारी गुरु आपने गोविंद दियो बताय। (गुरु व परमेश्वर दोन्हीहि उभे आहेत कोणाला शरण जाऊ? अर्थात् गुरूला. कारण गुरू परमेश्वरापेक्षां श्रेष्ठ आहे. त्यानेंच मला परमेश्वर दाखवून दिला).

आत्म्याचें शरीरापासून वेगळें अस्तित्व मान्य केलें तर विज्ञानशास्त्राला धाब्यावर कां बसवावें लागेल तें कळत नाहीं. जोपर्यंत विज्ञानशास्त्रानें माणूसच काय पण कोणताच सजीव प्राणी निर्माण करतां येत नाहीं तोपर्यंत याबाबतींत विज्ञानशास्त्र अधिकारवाणीनें बोलूं शकत नाहीं. मृतात्मे फक्त दुबळया माणसांच्या शरीरांतच प्रवेश करतात म्हणून ते खरें नाहीं असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. याबाबत बनवाबनवी करण्यास बराच वाव आहे यांत संशय नाहीं. पण म्हणून मागील जन्माची ओळख पटवून देणारी ठळक उदाहरणें, भूतबाधेचा प्रकार व telepathy चे आपल्याला व इतरांना येणारे अनुभव या सर्वांची शास्त्रीय चिकित्सा करण्याचा कोणी प्रयत्न केला नसला व अशा सर्व गोष्टी सर्रास बनवाबनवीच्या असतात असा जर कोणी शेरा मारू लागला तर तो शास्त्रज्ञ








तज्ञपणाचा आव आणणारा माणूस आहे असेंच म्हणावें लागेल. या गोष्टींची चिकित्सा करण्याएवढी भौतिक शास्त्राची प्रगति अजून झाली नाहीं हा नम्रपणाच खऱ्या शास्त्रज्ञाला भूषणावह ठरेल.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा कोणताहि बुद्धिवादी माणूस पुरस्कार करणार नाहीं हें लेखकाचें मत बरोबर आहे. पण तसें पाहिलें तर जगांतील कोणताहि इझम ( ism )-सोशालिझम्, कम्युनिझम् गांधीझम्, फॅसिझम्, वगैरे— हा पूर्णपणें बुद्धिवादी कसोटीवर उतरूं शकत नाहीं असेंच म्हणावें लागेल. कांटेकोर बुद्धिवादी माणसाला एकच ism मोकळा आहे तो म्हणजे Criticism !

शुद्धबुद्धीनें विचार केल्यास कोणतेंहि व्यावहारिक तत्त्व मग तें सामाजिक असो, वा राजकीय असो, अपूर्ण किंवा सदोष दिसल्यावांचून राहणार नाहीं. बुद्धिवादाचा आदर्श म्हणून आगरकर घेतले तरी त्यांना सुद्धां इष्ट असेल तें बोलेन पण शक्य असेल तेवढेंच करीन अशी कबुली देणें भाग पडलें. केवळ बुद्धीनें विचार केल्यास छिद्रान्वेषीवृत्ति ( Cynicism ) वाढत जाऊन कांहींच निष्पन्न होणार नाहीं. प्रत्येकजण आपल्या मनोधर्माप्रमाणें समाजांतील मूल्यांचा ( Social values ) कमी अधिक दर्जा ( Priorities ) ठरवतो व त्याप्रमाणें आपल्या मनोवृत्तीला अनुकूल असलेल्या पंथांत सामील होतो. यांत आक्षेपार्ह काय आहे ? व असें करण्यांत त्यानें समाजांतील इतर अज्ञ लोकांचा बुद्धिभेद केला या म्हणण्यांत तरी काय अर्थ आहे ?

कु. व्ही. ए. दाभोळकर

---

## पुस्तक-परामर्श

**मऱ्हाठी लावणी**— ले. प्रा. मधुकर वासुदेव धोंड. प्रकाशक — मौज प्रकाशन मुंबई, १९५६, पृ. २४१ किंमत सहा रुपये.

मराठी शाहिरी वाङ्मयाचा परिचय करून देणारी जीं अगदीं थोडीं पुस्तकें उपलब्ध आहेत, त्यांत या पुस्तकानें एक चांगली भर घातली आहे. या बद्दल लेखक व प्रकाशक अभिनंदनास पात्र आहेत. मराठी लावणीविषयीं प्रा. धोंड यांची आपुलकी प्रशंसनीय तर आहेच. पण त्यांत त्यांच्या चिकित्सक बुद्धीची भर पडल्यामुळें त्यांचें लिखाण चटकदार व मार्गदर्शक झालें आहे.

सुशिक्षित मराठी भाषिक समाजांत—निदान त्यापैकीं बहुसंख्य लोकांत गेल्या पन्नास वर्षांपूर्वी या विषयाबद्दलचा स्पष्ट तिटकारा आणि गेल्या दहा-पंधरावर्षांत अनुभवास येत असलेली जिज्ञासा, पाहिली म्हणजे मोठें आश्चर्य वाटतें. शाहिरी वाङ्मय कांहीं विशिष्ट गुणांनीं युक्त आहे आणि त्याचा समाजाला उपयोग होत होता, अशी दृष्टि अलीकडे उत्पन्न झाली आणि साहजिकपणें विद्वानांचें लक्ष त्या वाङ्मयाकडे वेधूं लागलें. या नव्या दृष्टीचा प्रभाव आतां दिसूं लागला आहे. प्रो. धोंड यांचें पुस्तक हें याचें एक आदरणीय उदाहरण आहे. ' मऱ्हाटी लावणी ' पुस्तकांत ७२ पृष्ठें प्रास्ताविक चिकित्सेनें व्यापलीं आहेत. पुढील १२३ पृष्ठांत एकसष्ट वेंचक लावण्या उद्धृत केल्या आहेत. २० पृष्ठांत शब्दार्थ व संक्षिप्त टीपा दिल्या आहेत. लावणीचीं परंपरा दाखविणारीं संत वाङ्मयांतील २० कवनें पुढील १७ पृष्ठांत उतरून घेतलीं आहेत. व शेवटीं संदर्भग्रंथ व लेख यांचें फेरिस्त दिलें आहे. अशा रीतीनें साधारण वाचकालाच काय पण अभ्यासकालाहि मार्गदर्शक, निदान साहाय्यक व्हावें असें हें पुस्तक आहे.

पुस्तकाचा उद्देश व त्याचें स्वरूप याविषयीं हा स्थूल विचार झाला. आतां त्याच्या अंतरंगाचीहि थोडी पहाणी करावयाची.

प्रा. धोंड यांनीं 'शाहिरी वाङ्मय' अशा व्यापक अर्थानें डोळयासमोर येणारी रचना आपल्या विवेचनासाठीं स्वीकारली आहे असें समजतां येत नाहीं. तसा स्पष्ट खुलासा पुस्तकांत नाहीं. पण पुस्तकांत शाहिर, लावणी, मेरिक रचना इत्यादि शब्दांची अशी सरमिसळ झाली आहे कीं त्यामुळें त्यांना त्या वाङ्मयाचा कोणता विवक्षित भाग आपल्या 'मखलाशी' सह वाचकांच्यापुढें सादर करावयाचा होता हें समजेनासें झालें आहे. हें वाङ्मय जेव्हां उपेक्षित होतें तेव्हां अशा सूक्ष्म नजरेनें त्याच्याकडे कोणी पहात नव्हतें. पण आतां विद्वान् लोकांनीं शास्त्रसंमत मार्गानें त्याची परीक्षा करण्याचें आरंभिल्यानंतर असा मोघमपणा सोडणें भाग आहे. शाहिरी वाङ्मयांत दिसून येणारे तीन निरनिराळया गुणांचे प्रकार दृष्टीआड केल्यानें सुरुवातीचा घोटाळा शिल्लकच राहील.

मनोविनोद, मनोरंजन व यशोगान या त्रिविध प्रकारांच्या कवनांच्या रचनेंत वापरलेला छंद व्यापक अर्थानें लावणी या नांवानें ओळखला जातो. हें वर्गीकरण मान्य होत नसेल तर तें कां मान्य होत नाहीं याचीं कारणें प्रो. धोंड यांनीं या पुस्तकांत नमूद करणें प्राप्त होतें. तसें त्यांनीं केलेलें नाहीं. नांव व वस्तु हीं दोन्हीं नेहमींच एक असत नाहींत. नांवें बदलतात पण वस्तूचें स्वरूप कायम राहतें. बेसन, झुणका, पिठलें हीं तीन नांवें एकाच वस्तूला महाराष्ट्रांतील तीन निरनिराळया भागांत लावतात. गोव्यांत चालू असलेलें 'पिठी' हें नांवहि विसरतां येत नाहीं. अशी स्थिति आहे, म्हणून नांव व वस्तु या दोन्हींची पाहणी युक्त ठरेल असें मला वाटतें. प्रो. धोंड यांनीं कोणत्या गुणाची लावणी आपल्या पुस्तकांत ग्रथित व संपादित केली आहे हें समजण्याला अडचण पडते ती या कारणानें.

ग्रंथकर्त्यानें पृ. १६ वर लावणीची व्याख्या दिली आहे ती अशी: 'सर्वसामान्य जनांच्या मनोरंजनासाठीं त्यांना रुचतील अशा लौकिक, पौराणिक वा आध्यात्मिक विषयांवर रचलेली जातिरचना म्हणजे लावणी. म्हणजे मनोरंजन हा मुख्य भाग त्यांत असला पाहिजे. पौराणिक व आध्यात्मिक विषयांतल्या मनोरंजनाला लौकिक विषयासारखाच मान देतां येत नाहीं. लौकिक विषयांतला आनंद तात्पुरता व पौराणिक आणि आध्यात्मिक विषयांत शाश्वत आनंद उत्पन्न होण्याचा हेतु असतो. म्हणून यांची गल्लत करणें प्रशस्त नाहीं. पुराणें ही केवळ मनोरंजनासाठीं निर्मिलेल्या कथाकहाण्या नव्हत. कांहीं आध्यात्मिक सिद्धांतांची उदाहरणें म्हणून त्यांची रचना झालेली असते. त्यांत कथाभाग असतो म्हणून सामान्य जनांना मनोवेधक वाटतात. पण निव्वळ आध्यात्मिक विषयांवर मनोरंजक रचना होऊं शकत नाहीं. ती एक तर निर्वचनात्मक असते. अथवा परोक्षपद्धतीनें सांगतांना गूढ ठेवून बुद्धीला आव्हान देणारी असते. किंवा तिसरा प्रकार म्हणजे कांही मान्य संकेतांच्या आधारावर रूपक पद्धतीनें सिद्धांत समजावून देणारी असते. या तिन्ही प्रकारांचा आश्रय मराठी शाहिरांनी केलेला आहे. पण त्यांतला भेद न उमजल्यामुळें कोठें कांहीं 'लौकिकी'हून निराळें—उच्च असें दिसलें कीं त्याला 'मेदिक' असें नांव रूढ झालें आहे. प्रा. धोंड यांनी नमुन्यासाठीं (पृ. ८५) दिलेल्या एका कवनाला मेदिक असें विशेषण लावलें आहे. पण तें कोणत्या प्रकाराचें मेदिक याचा खुलासा त्यांनीं केला नाहीं. आणि त्यांतून काय अर्थ निघतो हेंहि सांगितलें नाहीं. ज्या कारणासाठीं या कवनाला ग्रंथकर्त्यानें मेदिक असें म्हटलें आहे, त्याच कारणानें या पुस्तकांत घेतलेलीं आणखी कांहीं कवनें मेदिक स्वरूपाचीं आहेत. पण त्यांच्यावर ग्रंथकर्त्यानें मेदिक असा छाप मारलेला नाहीं. 'नट्टन थट्टन चालशी' (पृ. १२१) हें कवन पूर्वीं मेदिक म्हणून म्हटलेल्या कवनाहून








निराळया प्रकारचें आहे, म्हणजे पूर्णपणें लौकिक आहे असें प्रा. धोंड यांना वाटतें कीं काय ? तीच गत ' नाजुक रुपडें दिपडें ठिकडे ' या कवनाची आहे. यांना मेदिकांच्या सदरांत घालावें तर त्यांचा अर्थ सांगण्याची जबाबदारी ग्रंथकर्त्यावर येऊन पडली असती. पण ती त्यांनीं टाळली इतकेंच नाहीं, तर अशा एका कवनाचा मी अर्थ करून दाखविला असतांनाही माझी ' करामत वाखाणण्याजोगी ' आहे असें म्हणून प्रच्छन्न उपहास केला आहे. पण ती उघड उघड उसनी शिदोरी आहे. श्री. य. न. केळकर लावणींत कांहीं आध्यात्मिक स्वरूप नाहीं असें स्पष्ट म्हणतात. प्रो. धोंड त्वयार्धम् मयार्धम् करू पहात आहेत. पृ. ९२ वरील ' दुर्योधनाचें वर्म ' हें कवन त्यांच्या मतें मेदिकच आहे. कारण इतकेंच कीं त्यांत शेवटीं एक प्रतिपक्षाला अड-विण्यासारखा प्रश्न टाकला आहे. पण वर उल्लेख केलेल्या कवनांचा प्रकार कां व कसा निराळा आहे, हें प्रा. धोंड यांनीं दाखविलेलें नाहीं. परशुराम, सगनभाऊ इत्यादि शाहिरांची तमाशांत म्हटली जाणारी मेदिक लावणी जर उलगडून दाखविण्याचें प्रा. धोंड मनांत आणित नाहींत, तर त्या कवनांना मेदिक असें म्हणण्यांत अर्थ तो काय राहिला ?

याचें कारण इतकेंच कीं सदरहु पुस्तकांत समा-विष्ट केलेल्या टीपा नुसत्या शब्दार्थाच्या आहेत, अर्थबोधाच्या नाहींत. तो करून देण्याची जरूरी असतांना मौन स्वीकारल्यानें पुस्तकाच्या उपयुक्ततेंत मोठी उणीव शिल्लक राहिली आहे. या विषयावरचें सर्व लिखाण अजून प्रवाही स्थितींत असल्यामुळें मी व्यक्तिविषयक उल्लेख केला आहे. चर्चा चालू आहे, तोंपर्यंत असें हें चालावयाचेंच. तें कोणीहि मनावर घेऊं नये, अशी माझी विनंति आहे.

प्रस्तुत पुस्तकांत प्रभाकराच्या १७, रामजोशा-च्या १३, होनाजीच्या १२, परशुरामाच्या ७, सगनच्या ३, अनंत फंदीच्या २ आणि गंगू हैबती, धोंडी, बापू व ' वीरक्षेत्री ' यांच्या प्रत्येकी १ आणि २ अनामकवींच्या लावण्या दिल्या आहेत. कापडी यांनीं स. १८५४ मध्यें प्रसिद्ध केलेला एक जुन्यांत जुना संग्रह ग्रंथकर्त्या-च्या अवलोकनांत आला आहे आणि ब्रिटिश म्युझि-यम मधील लावण्यांच्या हस्तलिखितांच्या मायक्रो-फिल्मस त्यांनीं पाहून टाकल्या आहेत. इतका दीर्घ व्याप केला तेव्हां त्यांना निवडण्याला अगदीं आकुं-चित मर्यादा ठेवण्याचें कारण नव्हतें. विसोबा नांदे, बाळकृष्ण, महादू मल्हारी आणि त्यांच्या फडाचा कवि जुन्नरचा गोविंदराव हीं नांवें सहज सामावतां आलीं असतीं व त्यांनाहि या प्रातिनिधिक संकलनांत स्थान देणें न्याय्य ठरलें असतें. लिखित बाडांत हीं नांवें सहज आढळूं शकतीं. आधुनिक काळांत माहूरगडचें विष्णु कवि, दास गणु व नागपूरचें बोवडे यांचाहि समावेश करणें जरूर होतें. पुढें केव्हांतरी योग येईल तेव्हां विचार व्हावा म्हणून ही सूचना समजावी.

कवनांच्या विषयांत विविधता निःसंशयपणें साधली आहे. गण, पौराणिक आख्यान, चतुर-संवाद, भूपाळी, इष्कविषयक उपदेश, छेकापन्हुति, मेदिक, गवळण, होरी, उपेक्षिता, विरहिणी, सामाजिक आचारव्यवहार असे विषय निवडलेले आहेत. आणि त्यांत शाहिरांनीं आपली कवित्वशक्ति कशी चालविली आहे याचा पुरावा बानगीच्या रूपानें दिला आहे. तो पाहिला म्हणजे कोणाहि वाचकाला या शाहिरांच्या विषयीं आदर वाटावा, अशी योजना झाली आहे. मात्र या सुव्यवस्थेवर नुसते गालबोटच नव्हे तर काजळाचा थर चढावा अशा प्रकारची सहा सात कवनें पृ. १८० पासून पुढें दिलीं आहेत. या कवनांचा समावेश कोणत्या हेतूनें झाला आहे याचा उलगाडा मला होत नाहीं. मी इतकेंच म्हणतो कीं हीं कवनें अगदीं अटळ अशीं नव्हती.








त्या कवनांच्यावाचूनहि प्रातिनिधिक संकलन होऊं शकलें असतें.

मराठी लावणीची उपपत्ति लावतांना धोंड यांनीं अठराव्या शतकाच्या उत्तरार्धातील आणि एकोणविसाव्या शतकांच्या पहिल्या पदांतील महाराष्ट्रीय समाजाचा राजकारणी नैतिक ऱ्हास व त्यामुळें घडलेली सामाजिक अवनति यांचे सिंहावलोकन केलें आहे. लावणीच्या उत्कर्षाचा त्या काळांतील स्थितीशीं संबंध लावण्याचा उद्योग कोणी लेखक करतात. स्वतः प्रा. धोंड त्याशीं सहमत आहेत असें निक्षुन म्हणतां येत नाहीं. पण उलटपक्षीं त्या मतापासून अलिप्त आहेत, असेंहि त्यांच्या लिखाणावरून दिसत नाहीं. कदाचित असेंहि असेल कीं साहित्यचिकित्सेच्या अद्ययावत पद्धतीचा अभ्यास मी केलेला नसल्याकारणानें मला त्यांतलें मर्म उमजू शकत नाहीं. नानासाहेब पेशव्यांच्यापासून मराठी स्वराज्याच्या कल्पनेच्या अधिष्ठानांत आमूलाग्र फरक झाला आणि त्यामुळें अनेकवाद निर्माण झाले. त्यांची परिणति साम्राज्याचीं शकलें होण्यांत झाली. तो सर्व भाग चिंत्य आहे, याविषयीं वाद नाहीं. त्याचा लावणीवाङ्मयाशीं संबंध कसा जोडतां, तोडतां येईल, याची कसरत करणें या पुस्तकानें सुलभ होईल. परीक्षकांना एक उत्तम प्रश्न मिळाला हें मात्र खरें.

संतवाङ्मयाचा लावणीवाङ्मयाशीं कसा संबंध आहे या मुद्यावरचें प्रा. धोंड यांचें विवेचन वरवरचें असलें तरी वाचनीय असें आहे. लावणीची परंपरा दाखविण्यासाठीं संत-वाङ्मयांतले कांहीं दाखले पुस्तकांत दिले आहेत. ते यथायोग्य आहेत. लावणी रचणारे शाहिर हे संतवाङ्मयाच्यापासून साधन घेऊन आपली रचना करीत होते. या विषयीं दुमत असण्याला कारणहि नाहीं. म्हणून त्या दोन्ही प्रकारांच्या वाङ्मयांतल्या समान स्थलांचा एकमेकाशीं संबंध लावल्यानें विवेचनांत चांगली भर पडली असती. ‘ घनु वाजे घुणघुणा, वारा वाजे रुणझुणा ’ अशी अवस्था झाली असतांना ‘ चंदनाची चोळी माझें सर्व अंग पोळी ’ असें कां वाटावें याचा उलगडा आध्यात्मिक साधनेनें करतां येण्यासारखा होता. ‘ पैल काऊ कोकताहे ’ हें तर विचित्रच असें भासणारें आहे. शुभ शकून सांगतो तो काऊ म्हणजे पक्षांतला कावळा कीं समाधि मार्गातला ‘ ककारांत ’ (ज्ञानेश्वरी अ० ६-३०२) आहे हें वाचकांना समजलें आहे असें गृहीत धरून चालल्यानें काय साधलें ? ‘ वारियानें कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ’ या कवनाचा लावणींतील तत्सम रचनेशीं कसा संबंध येतो ? माणिकप्रभूंचे ‘ बंगल्याच्या खालून येतो जातो ’ हें पद काय हेतूनें घेतलें आहे ? ‘ बहुता जन्मींचा सुकृत व्हावा । तरी असा सखा नेत्रीं पहावा ’ या पंक्तींशी ‘ सखा राजेंद्र पाहिला दृष्टि ’ या ओळीशी जुळणी करून पाहिली असती तर सगनभाऊ सारख्या शाहिरावरचे बरेच आक्षेप बाजूस निघाले असते, पण तसें झालेलें पहाण्याला अजून अवकाश आहे. आतां येथपर्यंत मजल आली इतकेंच पुष्कळ झालें असें मानून, प्रा. धोंड यांच्या पुस्तकाची मी रजा घेतों.

— म. ना. सहस्रबुद्धे

**भारताची स्टेट बँक.** – ले. प्रा. म. अ. चान्सरकर, प्रकाशक : विद्या प्रकाशन, नागपुर, १९५६. पृ. २६. किंमत दहा आणे.

नागपूरच्या कॉमर्स कॉलेजचे प्रा. मधुसूदन अनंत चान्सरकर यांनीं अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यांना उपयोगी पडावी म्हणून ही पुस्तिका लिहिली आहे. गेल्या वर्षी झालेल्या इंपीरियल बँकेच्या राष्ट्रीयीकरणाची पार्श्वभूमि, राष्ट्रीयीकरण आणि त्यानंतर अस्तित्वांत आलेल्या स्टेट बँकेच्या प्रत्यक्ष व नियोजित कार्याविषयीं तिच्यांत थोडक्यांत माहिती देण्यांत आली असून अनेकांना ती उपयुक्त वाटेल असा विश्वास वाटतो. पुस्तिकेची किंमत मात्र बरीच जास्त वाटते.

**– गोवर्धन पारीख**

---

**बालबोध अर्थशास्त्र.**– ले. प्रा. भा. ह. मुंजे, प्रकाशकः विद्या प्रकाशन, नागपुर, १९५६. पृ. १२२. किंमत दीड रुपया.

माध्यमिक शिक्षण समितीनें (मध्यप्रदेश) माध्यमिक शालान्त परीक्षेसाठीं अर्थशास्त्र हा ऐच्छिक विषय ठेवल्यानें माध्यमिक शाळांतील मुलांसाठीं नागपुर विद्यापीठाच्या अर्थशास्त्र विभागाचे प्रमुख प्रा. भा. ह. मुंजे यांनीं पाठ्यपुस्तक लिहिलें आहे. शाळेंतील मुलांना प्रस्तुत विषयाचा सोप्या रीतीनें परंतु आशयास धक्का न लावतां परिचय करून देणें हें एक अत्यंत कठिण काम आहे. शालेय पातळीवर प्रस्तुत विषय बराचसा पृथक्करणाऐवजीं वर्णनात्मक पद्धतीनेंच हाताळणें योग्य होईल. तथापि प्रत्यक्ष अभ्यासक्रमाचा प्रश्न बाजूस ठेवला तरी देखील अर्थशास्त्राची मराठी वाचकांस तोंडओळख होण्याच्या दृष्टीनें हें पुस्तक उपयुक्त ठरेल असें वाटतें.

**– गोवर्धन पारीख**

---

**प्रांतरचना व महाराष्ट्र**– ले. वा. दा. रानडे, प्रस्तावनाः म. म. द. वा. पोतदार, प्रकाशकः वा. दा. रानडे, पुणें ४, १९५६, पृ. १०+१३२; किंमत दीड रुपया.

गेलें वर्षभर गाजत असलेल्या घटक राज्यांच्या पुनर्रचनेच्या प्रश्नाची चर्चा करणारें हें पुस्तक असून रा. पु. कमिशनचा अहवाल आणि त्यानंतरच्या चारसहा महिन्यांतील घटना यांचा त्यांत थोडक्यांत परामर्ष घेण्यांत आला आहे. सर्वच घटकराज्यांच्या पुनर्रचनेचा ( प्रांत हा शब्द आतां टाकणें जरूर वाटतें ) विचार त्यांत केला आहे. तथापि मुंबई व महाराष्ट्र या प्रश्नाचें कांहींसें विस्तृत, सुमारें वीस पानें, विवेचन असल्यानें पुस्तकाच्या नांवांत महाराष्ट्राचा उल्लेख स्वतंत्रपणें करण्यांत आला आहे.

पुस्तकांतील बहुतेक सर्व चर्चा रा. पु. कमिशनच्या अहवालाच्या अनुषंगानें करण्यांत आली असून लेखकाची भूमिका भाषिक तत्त्वावर आधारलेल्या पुनर्रचनेस अनुकूल व तिचा पुरस्कार करणारी आहे. यामुळें गेल्या वर्षांतील वादाच्या एका बाजूचें आकलन होण्यास प्रस्तुत पुस्तक उपयुक्त आहे. अर्थात् त्यांतील रशिया व चीनचीं उदाहरणें मात्र कांहींना वादग्रस्त स्वरूपाचीं वाटतील. त्याचप्रमाणें एकभाषिक राज्यांच्या पुरस्कर्त्यांना श्री. रानडे यांचें सारेंच म्हणणें पटेल असेंहि नाहीं. ही गोष्ट म. म. पोतदार यांच्या प्रस्तावनेवरूनच स्पष्ट होऊं शकेल. राज्यांच्या पुनर्रचनेचा वाद तूर्त तरी भारतीय संसदेच्या निर्णयामुळें निकालांत निघाला आहे. असें असलें तरी त्यांतील एका दृष्टिकोणाचें स्पष्टीकरण व मार्च १९५६ पर्यंतच्या घटनांची माहिती संकलित रूपानें या पुस्तकांत दिली असल्यानें त्याचें ऐतिहासिक दृष्ट्या आकलन होण्यास प्रस्तुत पुस्तक उपयोगी पडणारें आहे.

**— गोवर्धन पारीख**

---

## साभार पोंच

( १ ) 'उद्यांच्या महाराष्ट्राची वाटचाल'– संपादक. श्री. मा. प. मंगुडकर व प्रा. अरविंद मंगरूळकर, प्रकाशक – श्री. मा. प. मंगुडकर, चिटणीस, इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम्, पुणें शाखा. पुणें २.

( २ ) 'व्यक्ति-स्वातंत्र्याचा विकास'– ले. श्री. मा प. मंगुडकर, प्रकाशक – डॉ. अ. वि. नाईक, सचिव बहि:शाल शिक्षण मंडळ, पुणें विद्यापीठ, गणेशखिंड, पुणें ७

( ३ ) 'वनश्री-दर्शन' – ले. डॉ. म. वि. आपटे, प्रकाशक– बहि:शाल शिक्षण मंडळ पुणें विद्यापीठ, पुणें ७

( ४ ) 'भारतीय पशू'– ले. सौ. शकुन्तलाबाई पोंक्षे, प्रकाशक– बहि:शाल शिक्षण मंडळ, पुणें विद्यापीठ पुणें ७

( ५ ) 'घाटावरील श्रमिकांचीं लोकगीतें'– ले. सौ. अनसूया लिमये, प्रकाशक– बहि:शालशिक्षण मंडळ, पुणें विद्यापीठ, पुणें ७

( ६ ) 'बालबोध अर्थशास्त्र' – ले. प्रा. भा ह. मुंजे, प्रकाशक – श्री. बा. ह. मुंजे, विद्या प्रकाशन, वॉकडरोड, नागपूर.

( 7 ) *The Philosophy of Jñānadeva* – by B. P. Bahirat M. A., Publishers – Pandharpur Research Society, Pandharpur.

( 8 ) *Poona – A Re-Survey* – by N. V. Sovani, D. P. Apte and R. G Pendse. Publishers – Gokhale Institute of Politics and Economics Poona 4.

( 9 ) *Gandhi-Rajbhoj Correspondence ( 1932 – 1946 )* Editors : M. P Mangudkar M. A., G. B. Niranta M. A. Published by Secretary Bharat Dalit Sevak Sangh, Poona

卐 卐 卐 卐





अनुक्रमणिका








Regd. No B 5177



